शिक्षण-खात्याचा मंजुरी-क्रमांक : पापुमं २२८३/बा. भा. म. १-स. दिनांक ९-२-१९८३









महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ

पुणे

प्रथमावृत्ती : १९८३
पुनर्मुद्रण: १९९१



प्रकाशक : श्री.पी.वाय.साळवी,
नियंत्रक,
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ.
मुंबई 400018.

कागद : ६१ × ८६ सेमी. ६० जी. एस. एम.
या पुस्तकाचा कागद महाराष्ट्र राज्य शिक्षण-खात्याने सवलतीच्या दरात उपलब्ध करून दिला आहे.

जुळणी : श्री अरुण नाईक,
अक्षर प्रतिरूप प्रा. लि.,
वडाळा, मुंबई 400031.

मुद्रक : पु. ल. धोंड
गुरूदेव पॅकेजिंग,
पनवेल इंडस्ट्रिअल को-ऑप. इस्टेट, प्लॉट २८. पनवेल. जिल्हा. रायगड

मुद्रणादेश : N/Ptg/TB/11016
dt 14391(1.00)

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे.
सारे भारतीय माझे
बांधव आहेत.
माझ्या देशावर माझे प्रेम आहे.
माझ्या देशातल्या समृद्ध आणि
विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे.
त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता
माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.
मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा
आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन
आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.
माझा देश आणि माझे देशबांधव
यांच्याशी निष्ठा राखण्याची
मी प्रतिज्ञा करीत आहे.
त्यांचे कल्याण आणि
त्यांची समृद्धी
ह्यांतच माझे
सौख्य सामावले
आहे.

# प्रस्तावना

'बालभारती च्या नव्या वाचनमालेतील हे इयत्ता चौथीचे पुस्तक आपल्या हाती देताना आम्हांला विशेष आनंद होत आहे.

चौथीचे हे पुस्तक इयत्ता तिसरीच्या 'बालभारती'शी मिळते-जुळते व्हावे असा एक विशेष प्रयत्न यात केला आहे. हे पुस्तक शक्यतो निर्दोष व्हावे या हेतूने या पुस्तकाच्या चाचणीप्रती अनुभवी शिक्षक, शिक्षणतज्ज्ञ, प्रशिक्षण संस्था इत्यादींच्याकडे पाठवून त्यांचे अभिप्राय घेण्यात आले. त्यांनी केलेल्या सूचनांच्या संदर्भात मंडळाच्या मराठी-भाषा-समितीने आवश्यक ते संस्कार करून हे पुस्तक जास्तीत जास्त निर्दोष व अद्ययावत करण्याचा प्रयत्न केला आहे. आस्थापूर्वक घेतलेल्या परिश्रमाबद्दल मंडळ समितीचे आभारी आहे. तसेच, अगत्याने अभिप्राय पाठवून ज्यांनी ज्यांनी या पुस्तकाच्या संपादनास हातभार लावला, त्यांचेही मंडळ आभारी आहे.

या पुस्तकाचे अध्ययन-अध्यापन प्रभावी होण्याच्या दृष्टीने या पुस्तकाची शिक्षकांसाठी हस्तपुस्तिका उपलब्ध करून देण्याची योजना विचाराधीन आहे. मंडळाच्या या नव्या उपक्रमाचे शिक्षकमित्र स्वागत करतील अशी अपेक्षा आहे.

संचालक,
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती
व अभ्यासक्रम संशोधन मंडळ.

पुणे,
१ मे, १९८३
११ वैशाख, १९०५

'मराठी बालभारती इयत्ता चौथी ' या पुस्तकाची 'शिक्षकांसाठी हस्तपुस्तिका' उपलब्ध आहे.

# अनुक्रमणिका

# १. पाहुणा गोजिरा

(बाबा आमटे यांनी स्थापन केलेली 'आनंदवन' ही कुष्टरोग्यांची वसाहत चंद्रपूर जिल्ह्यात आहे. तिथे दरवर्षी मित्रमेळावा भरतो. त्या वेळेस सर्वजण आनंदाने नाचत, गाणी म्हणत चिमुकल्या रोपांची शृंगारलेल्या पालखीतून मिरवणूक काढतात व नंतर वृक्षारोपण करतात. या घटनेचे वर्णन या कवितेत केले आहे.)

आज ये अंगणा पाहुणा गोजिरा,
ये घरा आमुच्या सोयरा साजिरा.
वाजता नौबती
ये सखा सोबती,
खेळवा संगती, हा जरा लाजरा.
कोवळे देहुडे,
सावळे रूपडे,
पोपटी अंगडे शोभते सुंदरा.
हा वसंतासवे
सृष्टिला हासवे,
पालवे, बोलवे सानुल्या पाखरा.

श्रावणी न्हातसे,
आश्विनी गातसे,
साउली देतसे भूमिच्या लेकरा.
बासरी ऐकतो,
चांदणे झोकतो,
नाचतो, डोलतो, झोंबतो अंबरा.
गीत गाता मुखी
नाचवा पालखी,
छत्रछायाकृती मित्र आला घरा.



**शब्दार्थ व टिपा :** ****************************

**साजिरा** – सुंदर. **नौबत** – एक रणवाद्य. **देहुडे** – चिमुकला देह. **अंबर** – आकाश. **छत्रछायाकृती** – सावली धरणाऱ्या छत्रीच्या आकाराचा.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. या कवितेतील 'गोजिरा पाहुणा' कोण आहे ? त्याला पाहुणा का म्हटले आहे ?

२. या पाहुण्याविषयी कवीला कोणती भावना वाटते ? ती कोणकोणत्या शब्दांतून व्यक्त झाली आहे ?

३. या पाहुण्याला कवीने आणखी कोणकोणती नावे दिली आहेत ?

४. ही कविता चालीवर म्हटली, की ठेका धरावासा वाटतो. कविता चालीवर म्हणा आणि तालाचा किती सुंदर अनुभव येतो ते पहा.

---

# २. वात्सल्य

एकदा आमच्या घरमालकांनी गाय आणली. अंगणात ती उभी होती. काळीबाळी, लांब शेपटीची, ठुसकीशी होती. कपाळावर चांद होता. गाय अंगणात आल्याबरोबर तिच्या मस्तकी हळदकुंकू लावलं आणि मग तिला गोठ्यात नेऊन बांधली. वाड्यातली सगळी मंडळी गाईला पाहण्यासाठी जमा झाली होती. आम्ही मुलं सर्वांच्या पुढं उभी होतो. कपाळावर चांद होता म्हणून आम्ही तिला चंद्री म्हणू लागलो.

अमळशानं मोठी माणसं आपल्या कामाला गेली; पण आम्ही मुलं गाईभोवतीच राहिलो. कोणी तिच्या गळ्याखाली पोवळीला खाजवल्यासारखं केलं. गाईनं कानसुद्धा हालवला नाही. उलट ती डोळे मिटून मान पुढंच करू लागली. मग काय, आम्ही तिला बेधडक बिलगलोच! तिची पोळी खाजवत असताना तिनं माझा हात चाटायला सुरवात केली. तिची ती जाड खरखरीत जीभ माझ्या हातावरून प्रथम फिरली, तशी मी चमकून माझा हात जरा मागं घेतला; पण मग तिच्या जिभेच्या ओल्या खरखरीत स्पर्शाची मला अशी काही आवड निर्माण झाली म्हणता!



एके दिवशी मी उठून तोंड धूत होतो, तो आई म्हणाली, "चंद्रीची कालवड पाहिलीस का ?"

मी दात घासत होतो, ते थांबवून आईला विचारलं, "म्हणजे ? कुठाय ?"

"म्हणजे काय नि कुठाय काय! चंद्री पहाटे व्याली. कालवड कशी सुरेख आहे, पहा जा!"

मी कशातरी दोन चुळा फसाफस भरल्या आणि अंगरख्याला तोंड पुसत गोठ्याकडं पळालो. तिथं बाबू, गोपाळ, गंगू आणि नमी आधीच येऊन पोचली होती. गाईशेजारी बसलेल्या वासरापुढं गवताची काडी धरून नमी त्याला म्हणत होती, "खा, खा की."

मोठेपणाचा आव आणून गोपाळ नमीला म्हणत होता, "पहेरे येडपट! एवढंसं वासरू का कुठं गवत खातं ?"

त्यावर नमी हट्टानं म्हणत होती, "होच मुळी! खा रे वासरा. गोपाळचं ऐकू नको."

त्या सर्वांना बाजूला सारून मी वासराजवळ गेलो. त्याबरोबर वासरू चमकून उठलं. पण लगेच त्याचे पुढचे पाय सरकून ते पडलं. चंद्री रवंथ

थांबवून त्याची तांबूस लोकर जोरजोरानं चाटू लागली. तिनं त्याचं सगळं अंग चाटून काढलं. आंघोळीनंतर आईनं माझं डोकं पुसून काढल्यावर जसे माझ्या डोक्याचे केस दिसत, तसे वासराच्या अंगावरचे केस दिसू लागले.

गंगू माझ्यावर एवढाले डोळे करून म्हणाली, "बघ, पाडवलंस ना आल्याबरोबर वासराला!"

ही कोण आजीबाई मला बोलणार, असं मनात येऊन मी म्हणालो, "बॅरं, बॅरं!" आणि तसाच वासराला खेटून उभा राहिलो.

पुढं कितीतरी दिवस वासराच्या कौतुकातच गेले. चारपाच दिवसांतच ते चांगलं उभं राहू लागलं. जसजसं वासरू वाढत होतं, तसतशी त्याच्या अंगावरची लोकर छान साफ होत होती. तिच्यावर चमक येत होती. चंद्रीसारखाच त्या वासराच्याही कपाळावर चांद होता. ढोपरांवर पांढरे ठिपके होते. त्याचे डोळे नेहमी काजळ घातल्यासारखे कसे काय दिसतात, याचं मला व नमीला मोठं नवल वाटे. त्याचं नाव काय ठेवायचं, याचीही खूप चर्चा झाली. शेवटी काकू एक दिवस म्हणाल्या, "हरणासारखी दिसते कालवड. 'हरणी'च म्हणावं तिला."

तेव्हापासून आम्ही सगळी तिला 'हरणी' म्हणू लागलो.

पुढं एक दिवस चंद्री चरायला म्हणून जी गेली, ती खूप संध्याकाळ झाली तरी परत आली नाही. चांगली रात्र झाली, तेव्हा रडवं तोंड करून गुराखी आला. आमचे नाना त्याच्यावर कडाडले,

"काय रे हरबा, चंद्रीचा काय पत्ता?"

"दोपारपतुर समदयांबरोबर व्हती. फुडं कुटं गेली त्येचा पत्ता..."

हरबाला वाक्य पुरं करू न देता नाना गरजले,

"गुरं राखता का झोपा काढता! जा शोधून आण गाय."

आम्ही चुपचाप सगळं ऐकत होतो. हरणी तर संध्याकाळपासून दाराकडं तोंड फिरवून हंबरत राहिली होती. रात्र वाढत चालली तसतसं हरणीचं हंबरणं आम्हांला ऐकवेना. तिला वरून दूध पाजून पाहिलं, पाणी पाजून पाहिलं. तिच्या अंगाखाली गवताची शेज केली. थंडी वाजू नये म्हणून तिच्या अंगावर

पोतं टाकलं. पण कशाचा काही परिणाम होईना. चंद्रीच्या चाटण्याची सर कशाला येणार ? ती थरथर कापत होती आणि घोगरं हंबरत होती. त्या दिवशी आम्हांला धड जेवणसुद्धा सुचलं नाही.

सकाळ झाली तरी चंद्रीचा पत्ता लागेना. हरणी तर मलूल होऊन पडली होती. आता तिचं हंबरणंही थांबलं होतं. फक्त दाराकडं तोंड करून ती जरा तोंड उघडल्यासारखं करी, एक श्वास सोडी आणि पुन्हा डोळे मिटून पडून राही. आमच्या सगळ्यांच्या तोंडचं पाणीच पळालं.

साडेसात-आठचा सुमार असेल. आम्ही अंगणात हरणीच्या अवतीभोवती होतो. इतक्यात दरवाजाबाहेरून एक मोठा हुंकार आला. काकू अंग धूत होत्या. त्यांनी आवाज ओळखला. त्या तशाच उभ्या राहिल्या आणि उद्गारल्या, "आली वाटतं चंद्री!"

'खरंच!' म्हणून आम्ही तोंड वळवतो तो चंद्री दरवाजामधून जी सुसाट पळत आली, ती अंगणात येऊन हरणीपाशी उभी राहिली.

इतका वेळ अर्धमेली होऊन पडलेली हरणी वीज अंगात भरावी तशी ताडकन उभी राहिली. चंद्रीची कास तटाटली होती. तिला पान्हा अनावर झाला होता. हरणीचं तोंड कासेला लागण्याच्या आधीच तिच्या आचळांतून भळाभळा दूध सांडू लागलं. एकीकडं ती हरणीला पाजत होती आणि दुसरीकडं तिच्या पान्ह्याच्या धारा भुईवर सांडत होत्या.

काकू पटकन कोरडं नेसून हातात चरवी घेऊन आल्या आणि तोंडाला हात लावून म्हणाल्या, "मेलीला धीर नाही कसा तो!"

चंद्री वासराला चाटत होती आणि आम्ही सर्वजण थक्क होऊन वात्सल्याचं ते अपूर्व दृश्य टकमका पाहत उभे होतो!

**शब्दार्थ व टिपा :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**अमळशानं** - थोड्या वेळाने. **कालवड** - गाईचे मादी वासरू.

**वात्सल्य** - मुलांवरील माया. **अपूर्व** - नवीन;जे पूर्वी अनुभवले नाही असे.

**वाक्प्रचार :**

**तोंडचे पाणी पळणे** - खूप घाबरणे. **एवढाले डोळे करणे** - रागावणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. घरमालकांनी आणलेल्या गाईचे स्वागत कसे कसे झाले ?

२. हरणीचा जन्म होताच मुले का खूश झाली ? त्यांनी काय काय केले ?

३. चंद्री लवकर परतली नाही तेव्हा घरातल्या माणसांनी हरणीची कोणती काळजी घेतली?

४. (अ) गाईच्या पिलाला 'वासरू' म्हणतात. पुढे दिलेल्या प्राण्यांच्या पिलांना काय म्हणतात ते सांगा.

शेळी, म्हैस, घोडा, सिंह.

(आ) 'दृश्य' व 'देखावा' हे एकाच अर्थाचे शब्द आहेत. पुढील शब्दांना समान अर्थाचे शब्द सुचवा.

नवल, संध्याकाळ, थंडी, सर, चमक.

५. तुम्हांला एखादया वेळी घरी परतायला उशीर झाला तर तुमच्या आईच्या मनात कोणते विचार येतील ते सांगा.

---

# ३. झाडाची माया

जपान देशातील गोष्ट. एका गावात लिन-तू आणि शिन-तू या नावाचे दोन लाकूडतोडे होते. ते शेजारी शेजारीच राहत. जवळपासच्या रानातील लाकडे तोडून आणावी आणि तालुक्याच्या गावी नेऊन ती विकावी असा त्यांचा नित्यक्रम होता. लिन-तू प्रेमळ होता. त्याला झाडांची माया होती. त्याला ती सुंदर वाटत आणि ती आपल्याशी सुखदुःखाच्या गोष्टी बोलतात असेही वाटे. चरितार्थ चालवण्यासाठी त्याला लाकडे तोडावी लागत. पण तो फक्त वाळलेली लाकडे तोडी. हिरव्या झाडाची जिती फांदी तो सहसा तोडत नसे. ती तोडली तर झाडाला दगा होईल आणि ते शाप देईल असे त्याला वाटे. वाळकी फांदी तोडली तर त्याचा भार हलका होईल आणि ते दुवा देईल अशी त्याची भावना असे. त्यामुळे दिवसातून कशीबशी एक मोळी त्याला मिळे. ती विकून आलेल्या पैशांत तो आपली आणि कुटुंबाची गुजराण करी. मिळालेल्या

रोजगारात दिवस भागायचा; पण गाठीला काही उरायचे नाही, असे त्याचे चालले होते. मात्र आपल्या गरिबीतही तो आनंदात असे.

शिन-तूचे होते त्याच्या उलट. रोज रानात जावे आणि जास्तीत जास्त लाकडे तोडून आणावीत असा त्याचा खाक्या. ओली, सुकी असा विवेक तो करत नसे. जी लाकडे ओली असतील ती तो वाळत टाकी आणि सुकली की विकी. त्यामुळे थोड्याच वर्षांत तो चांगला गबर झाला.

शिन-तूची बायकोमुले सुखात आहेत आणि आपल्याला मात्र गरिबीत दिवस कंठावे लागतात, याचे लिन-तूच्या बायकोला फार वाईट वाटायचे. म्हणून एकदा ती आपल्या नवऱ्याला म्हणाली, "शिन-तू भाउजींप्रमाणं आपणही ताजी लाकडं तोडली असती तर आपल्यालाही भले दिवस नसते का आले ?"

ह्यावर लिन-तू म्हणाला, "झाडाची कोवळी फांदी तोडली तर त्यातून चीक वाहू लागतो, हे तू पाहिलं आहेस ना ? अग, तो चीक म्हणजे झाडाचं रक्तच. जे झाड आपल्याला उन्हात सावली देतं, डोळ्यांना सुख देतं आणि भुकेला घास देतं, त्याला जर आपण दुःख देऊ लागलो तर आपलं भलं कसं होईल ?"

यावर त्याची बायको काय बोलणार ? नवऱ्याचा हा स्वभाव ओळखून असले काही बोलण्याचे तिने सोडून दिले होते.

एकदा काय झाले – लिन-तू नेहमीप्रमाणे रानात गेला असताना एक केविलवाणे गाणे त्याच्या कानी आले. कोणीतरी कष्टी आवाजात म्हणत होते –

माझे घाव कुणि बांधिल का ?
जिवाच्या जखमा सांधिल का ?
मायेची दवा कुणि देइल का ?
जन्माचा दुवा कुणि घेइल का ?

लिन-तू या गीताने कावराबावरा झाला आणि अधीर नजरेने आजूबाजूला पाहू लागला. माणसाने बोलल्यासारखे शब्द तर त्याला स्पष्ट ऐकू येत होते; पण कुठेच कुणी माणूस दिसेना.

इतक्यात त्याचे लक्ष एका भुंड्या झाडाकडे गेले. त्याच्या साऱ्या लहानमोठ्या फांद्या कुणीतरी छाटल्या होत्या आणि त्यातून भळभळा चीक वाहत होता. लिन-तूने ओळखले की हे काम शिन-तूचेच. झाडाची ती केविलवाणी दशा पाहून त्याचे काळीज कळवळले. हे गीत झाडाचेच असे लक्षात येताच त्याने आपल्या अंगातला शर्ट काढला आणि भराभर त्याच्या चिंध्या करून त्याने त्या झाडाच्या साऱ्या फांद्या बांधून टाकल्या.

तोच काय चमत्कार! उभे झाड सर्वांगांनी गदगदले आणि लिन-तूच्या अंगावर गार गार थेंबांचा अक्षरशः सडाच पडला. त्याहून मोठा चमत्कार हा, की पडलेल्या प्रत्येक थेंबाची पिवळीधमक मोहोर झाली. झाडाचे उपकार मानून लिन-तूने साऱ्या मोहरा पिशवीत भरल्या आणि तो घरी परतला.



घरात एकाएकी अशी अमाप संपत्ती आल्यामुळे त्याच्या संसाराची कळाच बदलून गेली.

ही गोष्ट शिन-तूच्या लक्षात यायला उशीर लागला नाही. त्याने लिन-तूला विचारले, "काय रे, एका दिवसात तू इतका श्रीमंत कसा रे बाबा झालास ?"

लिन-तु आपला साधाभोळा. तो म्हणाला, "तू ज्या झाडाच्या एकूण एक फांद्या छाटल्यास त्यानंच माझ्यावर मोहोरांचा पाऊस पाडला."

शिन-तूला लोभ सुटला. त्याने ताडले, चिकाच्या थेंबांच्याच मोहरा झाल्या असतील. तो तातडीने घरी गेला. कुऱ्हाड व पिशवी घेऊन ते झाड त्याने लगबगीने गाठले.

लिन-तूच्या मायेमुळे त्या झाडाच्या अंगावर फांद्या फुटल्या होत्या. कुऱ्हाडीचे घाव घालीत त्या फांद्या तोडण्याचा शिन-तूने सपाटा चालवला.

आणि काय चमत्कार सांगावा! झाडाच्या तोडलेल्या फांद्यांतून चिकाचे अक्षरशः कारंजेच उडाले. त्यात शिन-तु पार बुडून गेला. त्यामुळे त्याला जागचे हालताही येईना. डोळ्यांच्या पापण्या एकमेकांना चिकटल्या, ओठ चिकटले, कान चिकाने भरून गेले. त्यामुळे एकाच वेळी तो आंधळा, मुका व बहिरा झाला.

तब्बल तीन दिवसांच्या उन्हाने एकदाचा तो चीक थोडाफार वितळला. शिन-तूचे पाय सुटले. पापण्या आणि ओठ तो कसेबसे उघडू शकला.

मोठ्या कष्टानेच त्याने कसेबसे घर गाठले. यापुढे आपण झाडाची जिवंत फांदी तोडणार नाही अशी त्याने प्रतिज्ञा केली.

तेव्हापासून जपान देशात जिवंत झाड कुणी तोडत नाही. तिथल्या लोकांत समज आहे, की जो झाडाची माया करतो तो सुखी होतो.

**शब्दार्थ व टिपा :** ****************************

**नित्यक्रम** – रोजचा कार्यक्रम. **गबर** – श्रीमंत. **तब्बल** – पुरेपूर.

**वाक्प्रचार :**

**चरितार्थ चालवणे** – आपले व कुटुंबाचे पोट भरणे. **गाठीला उरणे** – पैसा शिल्लक राहणे. **विवेक करणे** – काय योग्य, काय अयोग्य याचा विचार करून योग्य ते करणे. **कळा बदलणे** – असलेली स्थिती बदलून तिच्या उलट स्थिती येणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. लिन-तुला रोज लाकडाची एकच मोळी का मिळे ?

२. शिन-तु गबर झाला ते कशामुळे ?

३. झाड गीतात काय म्हणते ते तुमच्या शब्दांत लिहा.

४. लिन-तूच्या संसाराची कळा कशामुळे बदलली ?

५. जिवंत झाड तोडायचे नाही, ही प्रथा जपानमध्ये का पडली ?

६. शिन-तुने जशी प्रतिज्ञा केली तशा कोणत्या प्रतिज्ञा तुम्हांला कराव्याशा वाटतात ?

७. (अ) 'ओली' व 'सुकी' हे एकमेकाच्या उलट अर्थाचे शब्द आहेत. खालील शब्दांच्या उलट अर्थाचे शब्द सांगा.
शाप, गरिबी, भले, साधाभोळा, आंधळा.

(आ) घराच्या आवारात किंवा कुंडीत एखादे फुलझाड लावा आणि ते वाढवण्यातला आनंद घ्या.

# ४. चला चंद्रावर




एकदा रॉकेटदादा आमच्याकडं पाहुणा म्हणून आला. अंगणातून तो म्हणाला, "पोरांनो, चला. मी तुम्हांला चंद्रावर नेतो."

आर्मस्ट्रॉंग व आल्ड्रिन यांच्याप्रमाणं आम्हीही चंद्रावर जाणार याचा आम्हांला खूप आनंद झाला. आम्ही मुलं नाचत ओरडू लागलो, "चंद्रावर जायचं! चंद्रावर!"

रॉकेटदादा खूप खूप उंच होता. नारळीच्या झाडाहूनही उंच. तो बाहेर अंगणातच उभा होता. कसा अगदी पेन्सिलीसारखा दिसत होता. त्याचं डोकं टोक केलेल्या पेन्सिलीसारखं होतं. त्याचं अंग चकचकीत, गुळ-गुळीत होतं. त्याला चार पाय होते. तो आम्हांला खूप खूप गोष्टी सांगायचा. त्या सगळ्या आकाशाबद्दलच्या असत. आपल्या पृथ्वीभोवती त्यानं अनेकदा फेऱ्या घातल्या होत्या. सगळे ग्रह, तारे त्याला ठाऊक होते.

आम्ही त्याला विचारलं, "तू पडत कसा नाहीस रे खाली ?"

तो हसून म्हणाला, "चंद्र पडतो का ? तसा मीही पडत नाही." तो पुढं

म्हणाला, "पृथ्वी सगळ्या वस्तूंना आपल्याकडं ओढून घेते. म्हणूनच तुम्ही उडी मारली, की खाली येता. तुम्ही जेवढा जोर कराल तेवढी उडी उंच जाईल. मी खूप खूप जोर करून उडी घेतो. म्हणून खूप उंच जातो."

आम्ही विचारलं, "दिवाळीतला आमचा बाणही उंच जातो; पण तो तर पडतो. मग तू पडत कसा नाहीस ? फिरतच कसा राहतोस ?"

तो म्हणाला, "दिवाळीतल्या बाणाहून लाखोपटींनी माझी शक्ती जास्त आहे. तुमचा दिवाळीतला बाण ढगांपर्यंतसुद्धा पोचत नाही. मी निळ्या आकाशाच्या पलीकडं जातो. तिथं हवा नाही. आकाश काळं आहे. एकदा तिथं गेलो, की मला हवेचा किंवा कसलाच अडथळा राहत नाही."

आम्ही पुन्हा विचारलं, "अरे, पण तूच म्हणतोस ना पृथ्वी सगळ्या वस्तूंना खाली ओढते ? मग ती तुला कशी ओढत नाही ?"

"सांगतो," असं म्हणून तो सांगू लागला, "पृथ्वी आपल्याला खाली ओढत असते. पृथ्वीच्या या आकर्षणातून विशिष्ट गती असल्याशिवाय सुटका होत नसते. पृथ्वीभोवती मला फिरायचं असलं तर मी जरा तिरपा होतो आणि आणखी उसळी घेतो. गोफणीतला दगड जसा पडत नाही, तसा मीही पडत नाही. मी पृथ्वीभोवती अंतराळात काही वेळ फिरत राहतो."

आम्हांला फारसं कळलं नाही. तेव्हा रॉकेटदादा म्हणाला, "तुम्ही गोफणीत दगड ठेवून ती फिरवली आहे का ?"

आम्ही म्हटलं, "हो हो ! "

"डोक्याभोवती गोफण गरगर फिरवली, की हाताला दगडाची ओढ लागते. दगड बाहेर उडायला पाहतो; पण गोफण त्याला सोडत नाही. माझं त्या दगडासारखं होतं. मी दूर उडायला पाहतो; पण पृथ्वी मला आपल्याकडं ओढते. आमचे दोघांचे जोर सारखे झाले, की मी जमिनीवर पडत नाही. फिरत राहतो. समजा, एका मुलाला दोन बाजूंनी दोन मुलं सारख्या जोरानं ओढत असली, की मधला मुलगा जाग्यावरच राहतो ना ? तसं."

हे मात्र आम्हांला एकदम पटलं.

रॉकेटदादा म्हणाला, "चला, आता तुम्हांला चंद्रावरच घेऊन जातो."

आम्ही आनंदानं उड्या मारल्या. आम्हांला बसायला त्यानं स्वतःच्या डोक्याच्या आत एक पेटी ठेवली होती. रॉकेटदादा म्हणाला,"या पेटीला चांद्रयान म्हणतात."त्या पेटीत बसण्याआधी त्यानं आम्हांला खूप जाड कपडे घालायला दिले. सबंध डोकं व नोंड झाकेल असं काचेचं शिरस्त्राण त्यानं आमच्या डोक्यावर चढवलं.

मग शिडी लावून आम्ही वरच्या पेटीत जाऊन बसलो. रॉकेटदादा म्हणाला, "वर हवा नाही, पाणी नाही. इथं पोळीभाजी खाता येणार नाही. टूथपेस्टची ट्यूब असते ना, तशा पण मोठ्या ट्यूबमधून घट्ट लापशीसारखे पदार्थ ठेवले आहेत."

मग रॉकेटदादानं आम्हांला मऊ गादयांवर पट्ट्यांनी बांधून टाकलं. तो म्हणाला, "मी उडायला लागलो, की दोन मिनिटं कुणीतरी राक्षस तुमच्या छातीवर बसून तुम्हांला दाबतोय असं वाटेल; पण घाबरू नका. तीन मिनिटांत मग समोर हिरवा दिवा लागेल. तो लागला की तुम्ही पट्टे सोडून उभे रहा. नंतर पेटीसकट तुम्ही माझ्यातून बाहेर पडाल. ती पेटीच मग तुम्हांला चंद्रावर नेईल. मी जरी तुमच्याबरोबर येणार नसलो, तरी तुमच्याशी माझा संबंध राहीलच."

असं म्हणून रॉकेटदादा थरथरू लागला. त्यानं एकदम उसळी घेतली. आम्हांला खरोखरच वाटलं, की एखादा राक्षसच आमच्या छातीवर बसून आम्हांला दाबत आहे. जरा वेळानं हिरवा दिवा लागला. आम्ही भराभर पट्टे सोडले. आता पेटीच पुढं चंद्राकडं निघाली.

दूर अंतरावरून रॉकेटदादा म्हणाला, "आधार घेत घेत हळूहळू खिडकीशी जा."

आम्ही उठताच तरंगल्यासारखे अधांतरी राहिलो. आम्ही वेड्यासारखे एकमेकांकडं बघत राहिलो. एवढ्यात रॉकेटदादाचा आवाज आला, "आपण आता पृथ्वीभोवती फेरी सुरू केलीय. आता तुमच्या शरीराचं आणि इथल्या सगळ्या वस्तूंचं वजन नाहीसं झालंय. हातात पेन धरून तुम्ही ते सोडून दया. ते तसंच सोडल्या जागी तरंगत राहील; पण त्याला नुसती टिचकी मारली तरी ते वेगानं समोर जाऊन आपटेल."



आम्ही दोन्ही बाजूंचा आधार घेऊन सावकाश खिडकीकडं गेलो. तावदानातून बाहेर पाहिलं. समोर पृथ्वी पसरली होती. पृथ्वीची मोठी तपकिरी रंगाची वर्तुळाकार कडा दिसत होती. त्या कडेवर रुंद निळसर पट्टा चकाकत होता. त्या पट्ट्यापलीकडं काळंकुट्ट आकाश होतं आणि गंमत अशी, की बाजूला सूर्याचा गोळा दिसत होता, तरी आकाश काळंच होतं. टपोऱ्या चांदण्याही होत्या. मात्र त्या चमकत नव्हत्या.

इतक्यात एक मुलगा ओरडला, "भारत! आपला भारत!"

आम्ही बाहेर पाहिलं. भारत देशाचा निमुळता भाग आमच्या खालून सरकत होता. मग जरा वेळ पांढरे ढग आड आले.

रॉकेटदादाचा आवाज खूप दुरून आल्यासारखा वाटत होता. तो म्हणत होता, "आता पृथ्वीपासून दीडशे किलोमीटर उंचावरून आपण फिरत आहोत. साधारणपणे दोन तासांत आपण एक प्रदक्षिणा घालू. पृथ्वी कशी दिसते ते नीट पाहून घ्या. आणखी एक फेरी झाली, की मी पेटी चंद्राकडं नेणार आहे."

तेवढ्यात आमची दुसरी फेरी पुरी झाली. रॉकेटदादा म्हणाला, "इतका वेळ आपण तासाला वीस हजार किलोमीटर वेगानं जात होतो. आता सदतीस हजार किलोमीटर वेगानं आपण जाणार आहोत. तुम्ही परत आपापल्या गादयांवर पट्टे बांधून झोपा."

आम्ही पट्टे बांधून गादयांवर पडताच वेग वाढला.

आता आम्ही चंद्राकडं जाऊ लागलो. पृथ्वीभोवती फिरत असता सूर्य

भराभर मावळताना आम्ही पाहिला होता. रॉकेटदादानं आम्हांला पट्टे सोडायला सांगताच आम्ही पट्टे सोडले. अगदी हळू खिडकीशी आलो.

पृथ्वी भराभर मागं पडत होती. तिचा आकार लहान होत चालला होता. हळूहळू ती निळी दिसू लागली. मग तपकिरी दिसू लागली. तिच्याभोवती वेगवेगळ्या रंगांचे पट्टे दिसू लागले. सगळं कसं जादूच्या प्रयोगासारखं वाटत होतं!

आमचं चांद्रयान चंद्राच्या रोखानं निघालं.

एवढ्यात रॉकेटदादा म्हणाला, "आता एक फेरी घेऊन चंद्रावर उतरायचं."

आम्ही विचारलं, "खालून चंद्रावर हरिण दिसतं. खरोखरच चंद्रावर हरणं आहेत का?"

रॉकेटदादा हसून म्हणाला, "तुम्ही चंद्रावर उतरा नि पहा."

आम्ही मुलं एकदम ओरडू लागलो, "चंद्र! चंद्र! "

खाली चंद्रावर टेकताना धक्का बसेल असं वाटलं होतं; पण तेवढा धक्का बसला नाही.

शिडीवरून उतरण्याआधी रॉकेटदादा म्हणाला, "हे पहा मुलांनो, चंद्रावर हवा नाही. चंद्रावर उतरताना पाठीवर हवेचं नळकांडं नीट बांधा. नळकांड्यातल्या हवेचा श्वास घ्यायचाय. खाली उतरल्यावर जपून चाला. तुम्हांला धावावंसं वाटेल; पण धावू नका हं. उड्या तर मुळीच मारू नका. चंद्रावर सहज उडी मारली तरी खूप उंच जाते."

मग आम्ही शिडीवरून चंद्रावर उतरलो. पाहावं तिकडं खड्डे व टेकड्या. ऊन पडलं होतं. पण जिथं ऊन पोचत नव्हतं तिथं काळंकुट्ट दिसत होतं. क्षितिजापर्यंत सगळं उजाड होतं. सारंच कसं विलक्षण!

आम्ही हळूहळू जपून चालू लागलो. चालायला फार सोपं जात होतं. मी जरा उडी मारून पाहिली. बापरे! ती एकदम कितीतरी उंच गेली! हातातल्या लहानशा फावड्यानं माती उकरून पाहिली. सगळीकडं नुसती करडी माती. पृथ्वीसारखी इथं जर झाडं असती, गवत; ढग, नदी हे सारं

असतं तर किती मज्जा आली असती!

थोड्याच वेळात आम्ही परत आलो आणि शिडी चढून आत गेलो. दूरवर पृथ्वीचा गोल खूप मोठा व पांढरा-निळा दिसत होता. त्या सुंदर पृथ्वीला बघून आम्हांला आनंदाचं भरतं आलं! कधी एकदा तिथं परत जातो असं झालं.

चंद्रावरून क्षणात आम्ही उड्डाण केलं. चंद्राभोवती एक फेरी घातली आणि तोंड पृथ्वीकडे वळवलं.

जवळ जवळ येणारी पृथ्वी किती छान दिसत होती!

**शब्दार्थ व टिपा :** *****************************

**अंतराळ** – आकाशाची अथांग पोकळी, अवकाश. **शिरस्त्राण** – डोक्याचे रक्षण करणारे धातूचे आवरण

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. रॉकेटदादाचे थोडक्यात वर्णन करा.

२. पृथ्वी सगळ्या वस्तू आपल्याकडे ओढते; पण ती रॉकेटला का ओढू शकत नाही ?

३. चंद्रावर उतरल्यावर मुलांना सभोवती कोणकोणत्या गोष्टी दिसल्या ?

४. (अ) ह्या पाठात 'लाखोपट' असा शब्द आला आहे.
'पट' जोडून येणारे आणखी काही शब्द सांगा.
(आ) चंद्राबद्दल तुमच्या मनात येणारे विचार दहाबारा ओळींत लिहा.

५. **व्याकरण :**

पुढे दोन शब्दसमूह दिले आहेत : (अ) तो बाहेर अंगणात. (आ) तो बाहेर अंगणात उभा होता.

(अ) आणि (आ) यांमधील शब्दसमूहांत काही फरक जाणवतो का पहा. (अ) मधील शब्दसमूह वाचल्यावर अर्थ नीट कळत नाही. उदाहरणार्थ तो अंगणात काय करत होता हे स्पष्ट होत नाही. मात्र (आ) मधील शब्दसमूह वाचल्यावर अर्थ नीट समजतो. म्हणून (आ) मधील शब्दसमूह हे वाक्य आहे; परंतु (अ) मधील शब्दसमूह हे वाक्य नाही.

पुढील शब्दसमूहांपैकी वाक्ये कोणती ते सांगा आणि जे नुसते शब्दसमूह आहेत त्यांत योग्य ती भर घालून वाक्ये तयार करा.

(अ) मी तुम्हांला चंद्रावर नेतो. (आ) शाळेची इमारत. (इ) बाबांनी खाऊ.
(ई) आगगाडी वेगाने धावत होती.

६. (अ) या पाठात दिलेले रॉकेटचे चित्र मोठ्या आकारात वेगळ्या कागदावर काढा.
(आ) रॉकेट व चंद्र यांची विविध चित्रे गोळा करा व वहीत चिकटवा.

# ५. निर्धार



जोर मनगटातला पुरा
घाल, घाल खर्ची;
हाण टोमणा, चळ न जरा;
अचुक मार बर्ची!

दे टोले जोवरी असे
तप्त लाल लोखंड;
येइल आकारास कसे
झाल्यावर ते थंड ?

उंच घाट हा चढूनिया
जाणे अवघड फार;
परि धीर मनी धरूनिया
न हो कधी बेजार!

ढळू कधीही देउ नको
हृदयाचा निर्धार,
मग भय तुजला मुळी नको,
सिद्धि खास येणार!

झटणे हे या जगण्याचे
तत्त्व मनी तू जाण;
म्हणून उद्यम सोडू नको
जोवरि देही प्राण!

**शब्दार्थ व टिपा :** ******************************

**टोमणा** – घाव. **चळणे** – ढळणे; विचलित होणे. **निर्धार** – निश्चय. **सिद्धी** – यश. **उद्यम** – उद्योग; प्रयत्न.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. संधी आली की ती वाया घालवू नये ही कल्पना कोणत्या ओळीत आहे ?
२. यश मिळण्यासाठी कोणकोणत्या गोष्टींची आवश्यकता आहे ?
३. कोणते निश्चय करावेत असे तुम्हांला वाटते ?



# ६. लोकमान्य टिळक

एके काळी भारतावर इंग्रजांचे राज्य होते. हे पारतंत्र्य नाहीसे करून आपला देश स्वतंत्र करण्याचा निश्चय टिळकांनी तरुणपणीच केला होता. 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्‌ध हक्क आहे व तो मी मिळवीनच.' हा महामंत्र त्यांनी सर्व भारतीय जनतेला दिला.

इंग्रजी सत्तेचे जुलमी स्वरूप त्यांनी आपल्या अनेक लेखांतून व भाषणांतून लोकांसमोर निर्भयपणे मांडले. त्यामुळे लोकांच्या मनांत पारतंत्र्याबद्‌दल तिटकारा उत्पन्न झाला.स्वातंत्र्याचे महत्त्व त्यांच्या मनांवर ठसले.

स्वातंत्र्य मिळवण्यासाठी लोकांची शक्ती जर एकवटली तर भारतावर आपले राज्य टिकणे शक्य नाही, हे इंग्रज सरकार पक्के ओळखून होते. म्हणून देशभक्त टिळकांवर राजद्रोहाचा आरोप ठेवून त्यांच्यावर दोन वेळा खटला भरण्यात आला.

त्यांतला पहिला खटला सन १८९७ साली झाला. त्यात टिळकांना दीड वर्षाची सक्तमजुरीची शिक्षा ठोठावण्यात आली. राजकीय कैदी म्हणून त्यांना प्रथम मुंबईतल्या डोंगरीच्या तुरुंगात ठेवण्यात आले.

त्या तुरुंगात टिळकांचे आरंभी फार हाल झाले. त्यांना जेवायला जाड भाकरी आणि कांदा घातलेले कालवण देण्यात येई. टिळकांना कांदा मुळीच आवडत नसे. म्हणून कालवण बाजूस सारून ते नुसतीच भाकरी पाण्याबरोबर खात. याचा परिणाम होऊन त्यांची प्रकृती खालावली. त्यांचे वजन पुष्कळच कमी झाले.

तुरुंगात टिळक ज्या कोठडीत होते तिच्यावर पहारा करण्याचे काम एका मुसलमान शिपायाकडे आले. पुरेशा व सकस खाण्यावाचून टिळकांचे होणारे हाल पाहून त्याला फार वाईट वाटे.

मग एके दिवशी त्या शिपायाने घरी एक नारळ आणून त्यातल्या खोबऱ्याचे तुकडे केले. ते तुकडे व थोडा गूळ यांची त्याने एक पुडी बांधली आणि ती घेऊन तो तुरुंगातल्या आपल्या कामावर गेला.

कोणी आपल्याला पाहत नाही याची त्याने खात्री करून घेतली आणि ती पुडी कोठडीच्या गजांतून टिळकांकडे फेकली. पुडीतील खोबरे व गूळ पाहून टिळक त्याला म्हणाले, " बाबा रे, असं करू नकोस. तुरुंगाच्या अधिकाऱ्याला हे समजलं, तर तुला जबर शिक्षा होईल. तुला नोकरीतून काढूनही टाकतील. "

पण तो शिपाई म्हणाला, " आपण माझी मुळीच काळजी करू नका. तशीच वेळ आली तर आपल्यासाठी मी काहीही सोशीन. "

असेच त्याने दोन-तीनदा केले. एकदा तो शिपाई गूळखोबऱ्याची पुडी घेऊन आला असताना टिळक त्याला म्हणाले, " आता मात्र हे पुरे ! गूळखोबरं खाऊन उष्णानं माझं तोंड आलं आहे. "

हे ऐकून त्या शिपायास फार वाईट वाटले. उष्णावर उतारा म्हणून त्याने आणखी एक गोष्ट केली. बाजारातून त्याने थोडे बदाम आणले. त्याच्या बायकोने ते फोडले आणि त्यांतल्या बिया व थोडी खडीसाखर यांची एक पुडी करून ठेवली.

दुसऱ्या दिवशी कामावर गेल्यावर त्या शिपायाने ती पुडी गजांतून टिळकांकडे फेकली.

टिळकांनी त्याला असे न करण्याबद्दल पुन्हा आग्रहाने सांगितले. तरी तो

त्यांना मधूनमधून बदाम व खडीसाखर देतच राहिला. त्याच्या प्रेमाची ती भेट टिळकांना घ्यावी लागली.

काही दिवसांनी टिळकांना डोंगरीच्या तुरुंगातून दुसरीकडे नेण्यात आले. जाण्यापूर्वी टिळक त्या शिपायाला म्हणाले, " शिक्षेची मुदत संपल्यावर मी सुटून पुण्यास घरी परत जाईन. केव्हातरी मला येऊन भेट. "

त्याप्रमाणे पुढे तो शिपाई पुण्यास जाऊन त्यांना भेटला. टिळकांनी त्याला एक रेशीमकाठी उपरणे आणि वीस रुपये भेट म्हणून दिले.

* * *

त्यानंतर १९०८ साली टिळकांवर राजद्रोहाचा दुसरा खटला झाला. त्यात त्यांना शिक्षा होऊन ब्रम्हदेशातल्या मंडालेच्या तुरुंगात ठेवण्यात आले. तिथे ते सहा वर्षे होते.

त्या काळात टिळकांना पत्रे कोणी व केव्हा पाठवायची याबद्दल सरकारने काही नियम घालून दिले होते. टिळकांच्या घरी पुष्कळ दिवस काम करणारा बापू नावाचा एक सुतार होता. टिळकांच्या घरची माणसे जशी त्यांना ' दादा ' म्हणत, तसा बापू सुतारही त्यांना ' दादा ' म्हणे. त्याला वाटे, की आपणही दादांना मंडाल्याला पत्र पाठवावे; पण सरकारी नियमांप्रमाणे त्याला काही पत्र पाठवता येत नव्हते.

काही दिवसांनी टिळकांसाठी पुण्याहून पुस्तके व इतर काही वस्तू पाठवायची सरकारने परवानगी दिली. त्यासाठी एक लाकडी पेटी तयार करण्याचे काम बापूकडे आले. पेटी आपल्या दादांकडे जाणार आहे हे बापूला समजले होते. म्हणून त्याने तिच्या झाकणाच्या आतल्या बाजूवर ' बापू सुताराचे दादांना दंडवत ' असे पेन्सिलीने लिहिले.टिळकांना पत्र लिहिण्याची आपली इच्छा त्याने अशा रीतीने पुरी केली. ती फळी काढल्यावर दादांना आपण लिहिलेले लगेच दिसेल आणि त्यांना आपले दंडवत पोचतील अशी त्याला आशा वाटत होती.

* * *

समाजाच्या सर्व थरांतल्या लोकांचे टिळकांवर असे अपरंपार प्रेम होते. म्हणूनच त्यांना ' लोकमान्य ' म्हणण्यात येऊ लागले.

**शब्दार्थ व टिपा :** ******************************

**महामंत्र** – चांगल्या गोष्टीची प्रेरणा देणारे स्फूर्तिदायक वचन. **राजद्रोह** – राजसत्ता उलथून टाकण्यासाठी केलेली कृती. **सक्तमजुरीची शिक्षा** – तुरुंगात शारीरिक श्रमाची कामे करण्याची शिक्षा. **उपरणे** – अंगावर घ्यायचे जरीकाठी किंवा रेशीमकाठी उंची वस्त्र. **अपरंपार** – अमर्याद; अतिशय.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. लोकमान्य टिळकांनी तरुणपणीच कोणता निश्चय केला होता ?
२. त्यांच्यावर कोणता आरोप ठेवला गेला ? का ?
३. शिपायाची टिळकांवरील भक्ती त्याच्या कोणत्या कृतींतून दिसून येते ?
४. बापू सुताराने टिळकांना आपले दंडवत कसे कळवले ?
५. टिळकांना 'लोकमान्य' असे का म्हणतात ?
६. (अ) 'लोक' या शब्दास 'मान्य' हा शब्द जोडून 'लोकमान्य' हा शब्द तयार झाला आहे. खालीलपैकी प्रत्येक शब्दास 'मान्य' हा शब्द जोडून अशा प्रकारचे शब्द तयार करा आणि त्यांचा वाक्यात उपयोग करा.
   देश, रसिक, राज.
   (आ) 'स्वातंत्र्य' आणि 'पारतंत्र्य' हे एकमेकांच्या विरुद्ध अर्थाचे शब्द आहेत. खालील शब्दांच्या विरुद्ध अर्थाचे शब्द सांगा.
   स्वतंत्र, निर्भय, जाड, उष्ण.
७. **व्याकरण :**
   खालील शब्द जुळवून वाक्ये तयार करा.
   (अ) भाकरी नुसतीच खात पाण्याबरोबर ते.
   (आ) आला मोठा नदीला होता पूर.
   (इ) शर्यतीत घेतला पळण्याच्या भाग मी.
   (ई) नव्हते पूर्वी खेड्यात दिवे विजेचे.
   (उ) स्वच्छ शाळा आपण आपली पाहिजे ठेवली.
८. (अ) लोकमान्यांच्या आणखी काही आठवणी मिळवून त्या टिळक-पुण्यतिथीच्या दिवशी बालसभेत सांगा.
   (आ) भारतातील काही महान नेत्यांच्या घोषणा मिळवा आणि आपल्या वहीत लिहा.

---

# ७. भूमिगत

८ ऑगस्ट १९४२ चा दिवस. गांधीजींनी इंग्रजांना 'छोडो भारत' हा अखेरचा इशारा दिला आणि बेचाळीसची चळवळ सुरू झाली. वणवा पसरावा तशी ती देशभर पसरली.

याच काळातील एक मध्यरात्र. सगळीकडे सामसूम झाली होती. एक व्यक्ती अंधारात सावधपणे चालली होती. एका घरापुढे ती थांबली. आजूबाजूचा कानोसा घेतला. आपल्याला कोणी पाहत नाही अशी खात्री झाल्यावर तिने हळूच दाराची कडी वाजवली.



दार उघडले गेले. आतल्या माणसाला कंदिलाच्या प्रकाशात एक थकला-भागलेला चेहरा दिसला. त्याच्या डोळ्यांत भर्रकन अनेक भाव चमकून गेले. धास्तावलेला तो चेहरा पाहून आतल्या माणसाने कंदील चटकन बारीक केला. आलेल्या माणसाला आधी आत घेऊन दार लावले आणि विचारले, "शंकर, अशा अवेळी कसा ?"

"अब्दुल, मला आसरा हवाय. मी तुरुंग फोडून आलोय!"

"अरे, काही काळजी करू नकोस. या अब्दुलच्या घरात तुझा विश्वासघात होणार नाही."

"म्हणूनच मी तुझ्याकडं यायचं धाडस केलं. पोलीस माझ्या शोधात असतील."

"असू देत. या घरात दुसरं कोणी आहे, याचा पत्तादेखील लागणार नाही कुणाला."

"पण भाभी..."

"तिला जे सांगायचं ते मी सांगेन. तू निर्धास्त रहा. तुला भूक लागली असेल. जेवण कर आणि शांत झोप. फार दमलेला दिसतोस तू."

अब्दुलने शंकरला स्वतःच वाढले. त्याच्या झोपण्याची व्यवस्था करून दिली. शंकर निश्चिंत मनाने झोपी गेला.

अब्दुलची पत्नी जैबुन पहाटे उठली. नेहमीप्रमाणे रोजची कामे ती आटपू लागली. अब्दुल गंभीरपणे जैबुनसमोर उभा राहिला. इतक्या सकाळी आपला नवरा कसल्या विचारात गढलाय हे तिला कळेना.

एवढ्यात अब्दुल तिला म्हणाला, "जैबुन, काल रात्री आपल्याकडं जो पाहुणा आला आहे ना, तो कोण आहे माहीत आहे? तो एक क्रांतिकारक आहे! तो आपल्या घरात लपलाय हे कोणालाही कळता कामा नये, म्हणून त्याचं जेवणसुद्धा त्याच्या खोलीतच देत जा. तो असेपर्यंत दुसऱ्या कुणालाही आपल्या घरी बोलवू नकोस. आणखी एक काळजी घे. बाहेर जाताना घराला कुलूप लावून जात जा."

एवढ्यावरून जे समजायचे ते तिला समजले. आपला पाहुणा हा एक देशभक्त आहे. आपला देश स्वतंत्र व्हावा म्हणून इंग्रजांविरुद्ध तो लढत आहे. आपली बायकोमुले, घरदार या सर्वांना सोडून आपल्या जीवाचीही पर्वा न करता तो चळवळीत पडला आहे. म्हणून आपल्याला करता येईल ती मदत आपण करावी असे तिने ठरवले.

त्या दिवसापासून शंकर त्या अंधाऱ्या खोलीत अंगावर घोंगडी घेऊन मुसकटून पडायचा. जैबुन त्या खोलीला बाहेरून कुलूप लावायची. गुपचूप जेवणाचे ताट नेऊन द्यायची. अंधाऱ्या खोलीतील शंकरचा चेहरादेखील तिने कधी पाहिला नाही. सारे काम आटोपले, की घराला कुलूप लावून ती

मैत्रिणीकडे जाऊन बसायची. रस्त्यात पोलीस दिसला, की कडेवरच्या मुलीला क्षणभर घट्ट छातीशी धरायची. मनात धास्तावून जायची.

शंकरला परत पकडण्यासाठी इंग्रज सरकार पाळत ठेवून होते. त्याला पकडून देणाऱ्यास मोठे बक्षीसही जाहीर केले होते. तो हाती लागावा म्हणून पोलीस जंग जंग पछाडत होते. तो सापडला असता तर अनेक भूमिगतांचा ठाव लागला असता. म्हणून पोलीस शंकरसारख्या कार्यकर्त्यांच्या मागे हात धुऊन लागले होते.

शंकरसारख्या भूमिगतांना एकाच घरात फार दिवस आसरा घेणेही धोक्याचे असते. म्हणून काही काळ लोटल्यानंतर दुसरी व्यवस्था करून शंकरने अब्दुलचे घर सोडायचे ठरवले.

एक कार्यकर्ता त्याला ठरलेल्या नव्या ठिकाणी न्यायला आला.

निघण्यापूर्वी शंकर अब्दुलला उराउरी भेटला. दोघांच्याही डोळ्यांत पाणी तरारले. अब्दुल म्हणाला, "जपून जा... काळजी घे."

शंकर भाभींचा निरोप घ्यायला विसरला नाही. खालमानेनं तो म्हणाला, "भाभी, तुम्ही माझ्यासाठी फार तसदी घेतली. धोका पत्करला. मी तुम्हां दोघांना आयुष्यात कधीही विसरणार नाही."

असे बोलून तो निघाला. जैबुन त्याला पाठमोरा पाहतच राहिली. आजवर अंधाऱ्या खोलीतच तो पडून राहिल्याने आपण त्याला कधी धड पाहिलेही नाही,असे तिच्या मनात येऊन गेले.

* * * *

१५ ऑगस्ट १९४७ रोजी भारत स्वतंत्र झाला. सगळीकडे कसे चैतन्य पसरले! आनंदीआनंद झाला.

भूमिगत कार्यकर्त्यांचा सत्कार करण्यात आला. अब्दुलने या समारंभात उत्साहाने भाग घेतला. जैबुनलाही सोबत नेले.

व्यासपीठावर सर्व भूमिगत कार्यकर्ते बसले होते. अब्दुलने गमतीने जैबुनला विचारले, "यांतला कुठला भूमिगत आपल्याकडं राहिला होता, हे सांग बघू."

साऱ्या भूमिगतांकडे जैबुनने नजर टाकली. पण छे! त्यांतला कोण आपल्या घरी राहिला होता, हे काही तिला ओळखू आले नाही.

**शब्दार्थ व टिपा :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**भूमिगत** – पोलिसांच्या हाती न लागता देशकार्यासाठी गुप्तपणे कामे करणारा. **चैतन्य** – जिवंतपणा; उत्साह. **व्यासपीठ** – सभेत पाहुणे व वक्ते यांच्यासाठी केलेली उंच जागा. **कानोसा** – चाहूल.

**वाक्प्रचार :**

**हाती लागणे** – सापडणे. **जंग जंग पछाडणे** – पराकाष्ठेचे प्रयत्न करणे. **हात धुऊन मागे लागणे** – जोराने पाठपुरावा करून सतावणे. **उराउरी भेटणे** – मिठी मारणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. अब्दुलने रात्रीच्या वेळी आलेल्या व्यक्तीस घरात का घेतले ?
२. सरकारने बक्षीस का जाहीर केले ? अब्दुल व जैबुन यांनी शंकरचे नाव का सांगितले नाही ?
३. अब्दुलने 'जपून जा... काळजी घे' असे शंकरला का म्हटले ?
४. पुढील वाक्प्रचारांचा उपयोग करून नवी वाक्ये तयार करा.
उराउरी भेटणे; हाती लागणे; हात धुऊन मागे लागणे; जंग जंग पछाडणे.
५. **व्याकरण :**

बापू, मेरी, जैबुन ही व्यक्तींची नावे आहेत. .
गाय, कुत्रा, वाघ, ही पशूंची नावे आहेत.
कावळा, चिमणी, पोपट ही पक्ष्यांची नावे आहेत.
चिंच, बाभूळ, वड ही झाडांची नावे आहेत.
पण वर दिलेली ही सर्व वस्तूंची नावे आहेत.
तसेच पाणी, कागद, जमीन, हवा, विचार, आनंद हीदेखील वस्तूंचीच नावे आहेत.
वस्तूच्या नावाला 'नाम' म्हणतात.
खालील वाक्यांतील नामे ओळखा.
(अ) शंकर अंगावर घोंगडी घेऊन झोपत असे.
(आ) जवाहरलालना लाल गुलाब आवडे.
(इ) आकाशातील चांदण्या पाहून मुलाला एक कल्पना सुचली.
(ई) गाय बांधावरचे गवत खाऊ लागली.

---

# ८. आमचा खंड्या



आमचा खंड्या आम्हा मुलांपैकीच एक होता. इतकेच की तो चार पायांवर चालत असे आणि त्याला बोलता येत नसे.

आमच्या घरी तो आला तेव्हा ते एक लहान पिलू होते, तरी हाडापेराने थोराड वाटे. वयाच्या मानाने दांड दिसत असे. अंगावरचे केस इतर कुत्र्यांच्या मानाने थोडे लांब होते. छाती, मांड्यांची मागची कड आणि मान यांवरचे केस विशेषच लांब होते. पण खंड्याची खरी शोभा म्हणजे त्याचे कान होते. आतले कानाचे कोके फार मोठे होते असे नाही. पण त्यांवर वाढलेले केस एखाद्या गोसाव्याच्या दाढीप्रमाणे लांबलचक होते. खाली वाकून तो हुंगत असला तर त्याच्या त्या केसांची टोके भुईला लागत. या लांब केसांमुळे खंड्याचा चेहरा मोठा गंभीर दिसे. मी कितीही तपशिलाने या आमच्या लहानपणच्या सोबत्याचे वर्णन केले; तरी त्याचा मोहरा डोळ्यांपुढे जसाच्या तसा उभा राहणे कठीण आहे.

प्लेगच्या दिवसांत आम्ही दरसाल रानात राहायला जायचे. राखणीला बरोबर खंड्या असला म्हणजे कोणीही बिनघोर घोरत पडावे! नुसत्या उग्र मुद्रेच्या बळावरच तो माणसांना पंचवीस हात दूर उभे करी. पण त्यांना माहीत नसायचे, की हा कुत्रा कोकरासारखा गरीब आहे. अंगणात वाळत घातलेल्या सतरंजीवर पोरे गमतीने पसरलेली असली म्हणजे त्यांच्यात हा जायचा. ती मुलेही त्याला धरून लोळवत, त्याला 'आ' करायला लावत आणि त्यांच्या

त्या अक्राळ-विक्राळ तोंडात खुशाल हात घालत; पण खंड्या कुणाला कधी चावला नाही, की कुणाला त्याने कधी ओरबाडले नाही.

या प्राण्याला माणसाचे शहाणपण होते. खरे म्हणजे शहाण्या माणसाचे शहाणपण त्याला होते, असे म्हटले पाहिजे. स्वयंपाकघरात आमची पंगत बसलेली असायची. तो आमच्या समोरून जाई; पण या शहाण्या प्राण्याने एकदाही कधी आमच्या ताटाकडे किंवा स्वयंपाकाकडे ढुंकूनही पाहिले नाही. मग थांबून भाकरीसाठी शेपटी हालवणे लांबच राहिले ! हे त्याचे वर्तन खरोखर अगदी शहाण्या माणसासारखेच असे.

खंड्याचे शहाणपण माणसांनासुद्धा लाजवणारे होते. एकदा गावात प्लेगची साथ असल्यामुळे आम्ही रानात राहत होतो. तेथून तीन-चार मैलांवर माझी बहीण दुसऱ्या एका रानात प्लेगनिमित्त राहत असे. ती तेथे प्लेगनेच वारली, म्हणून तिच्या घरच्या मंडळींना आम्ही आमच्याकडे घेऊन आलो. बरोबर त्यांची अंथरुणे-पांघरुणे होती. ती घरात घेणे धोक्याचे होते. आमचे वाडगे खूप ऐसपैस होते, म्हणून आमच्या झोपडीपासून बऱ्याच अंतरावर एका बाजल्यावर ही सारी चिरगुटे आम्ही उन्हात ठेवून दिली. ती तीनचार दिवस तेथेच ठेवायची होती. वाडग्यात येण्याची कोणाची प्राज्ञा नव्हती. म्हणून रात्रीच्या वेळी ती कोणी घेऊन जाईल असे आम्हांला कधी वाटलेच नाही.

रात्र पडली. आम्ही झोपी गेलो. खंड्या झोपडीच्या बाहेर दाराशीच नेहमीप्रमाणे होता. सकाळी उठून पाहतो तो खंड्या अंगणात नाही! आम्ही इकडेतिकडे पाहू लागलो. जाता जाता त्या दूर टाकलेल्या कपड्यांकडे गेलो, तो त्या बाजल्याच्या शेजारी नख्यांनी काढलेल्या एका डबऱ्यात खंड्या पांय पुढे पसरून बसलेला! धन्याची चिरगुटं झोपडीपासून लांब पडलेली होती, ती जातील ही खंड्याला भीती होती! म्हणून नेहमीचे अंगणातील ठिकाण सोडून हा इमानी प्राणी त्या बाजल्यापाशी रात्रभर बसून राहिला. थंडी लागत होती म्हणून त्याने नख्यांनी एक पसरट डबरा काढला आणि त्याच्या उबेत कपड्यांवर खडा पहारा करत आमचा हा मित्र सकाळपर्यंत ताटकळत राहिला होता.

एकदा आमची गाय आम्ही वाड्याच्या बाहेर चरायला सोडली होती. समोर हिरवळ लांबवर पसरलेली होती. मी तिथेच हिरवळीवर आडवा झालो होतो. खंड्या शेजारी होता. चरता चरता गाय बरीच दूरवर गेली. तिला लांबलचक कासरा बांधलेला होता. माझ्या अंगाला राहिलेले त्याचे टोक धरून मी गाईला परत ओढू लागलो. गाय जवळ येईना. मी जोर करताच गाय बेफाम बनली. गाय मोठी चपळ होती. तिचा मोहराही मोठा देखणा आणि मानीपणाचा दिसे. मी तिला ओढत आहे हे तिला खपले नाही. पाठीवर शेपटी घेऊन ती चारही पाय उचलून उड्या मारू लागली. मी कासरा ओढतच होतो. या झटापटीत त्या लांबलचक कासऱ्याचे तीनचार विळखे माझ्या पायांच्या भोवती पडले. गाय तर उड्या मारत पळू लागली. माझी फरफटच झाली. इमानी खंड्या शेजारी होता. त्याने माझी स्थिती ओळखली आणि तो गाईच्या



समोर जाऊन तिला अडवू लागला. गाय वळेल तिकडे खंड्या पुढे होई. त्याने भुंकून भुंकून गाईचा मार्ग बंद करण्याची वेळ आणली. त्याने त्या गाईला असे रोखून धरले, की तिला थांबणे भागच पडले. त्या प्रसंगाच्या खुणा अजूनही माझ्या दंडावर आहेत आणि खंड्याच्या पराक्रमाचे स्मरणही माझ्या मनात कायम आहे.

आम्ही प्लेगचे दिवस शेतावर काढले आणि प्लेग संपला म्हणून घरी परत आलो. एक आठवडा गेला असेल. एके दिवशी खंड्या सकाळी गोठ्यातील आपल्या जागीच बसून राहिला. काठीने थोडेसे ढोसल्यावर तो बाहेर आला,

पण मागले-पुढले पाय ताणून आळस देऊ लागला. डोळे आणि मान लांबवून काही चमत्कारिक फूत्कार करू लागला. आम्हांला वाटले, खंड्याला थंडी झाली असावी आणि म्हणून तो आळसावला असावा. दुपारी नेहमीप्रमाणे दूधभाकरीचा काला त्याच्यापुढे आणून ठेवला, पण खंड्याने पडल्या-पडल्याच मान वर करून त्या भांड्याकडे पाहिले आणि पुन्हा तो मुरकटून पडला. त्याला मी पुष्कळ आंजारले-गोंजारले, 'खंड्या, खंड्या' म्हटले, पाठीवर थोपटून 'ऊठ ना' म्हणून दोनतीनदा जोराने ओरडल्यासारखे केले. पण घशातून 'गुरगुर' आवाज काढून तो अधिकच सताड पसरला. खंड्याचे अंग तापले होते. मी हाताने त्याची मान चाचपून पाहिली, तो कोयीसारखी गाठ हाताला लागली ! अरेरे ! खंड्या प्लेगने मरणार हे आता ठाम ठरले. खंड्याच्या या दुखण्याने आमच्या तोंडचे पाणीच पळाले.

म्हसवडच्या माळावर जन्मलेला हा जीव, आमच्या घरी साताऱ्यास वाढून, प्लेगने नाहीसा झाला.

घरातले माणूस गेल्याने जे दुःख होते तेच आम्हांला झाले !

**शब्दार्थ व टिपा :** ****************************

**दांड** – हाडापेराने मोठा. **कोके** – कानाचा आतील भाग. **मोहरा** – चेहरा. **वाडगे** – परस घरातील मोकळी जागा. **प्राज्ञा** – हिंमत. **डबरा** – खळगा. **फूत्कार** – जोराचा सुस्कारा. **कासरा** – गाईबैलांना बांधायची लांब दोरी.

**वाक्प्रचार :**

**ढुंकूनही न पाहणे** – पूर्ण दुर्लक्ष करणे. **रात्र पडणे** – रात्र होणे. **तोंडचे पाणी पळणे** – खूप घाबरणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. खंड्याच्या शहाणपणाचे एखादे उदाहरण सांगा.
२. खंड्याच्या ठिकाणी कोणकोणते गुण दिसतात ?
३. खंड्याने केलेल्या पराक्रमाचे स्मरण लेखकाच्या मनात आहे, तो प्रसंग थोडक्यात सांगा.
४. खंड्या गेल्याने लेखकाला दुःख का झाले ?

५. **व्याकरण :**

१. या पाठातील चौथा परिच्छेद वाचा आणि त्यातील नामे शोधा.

२. खालील वाक्यांत रिकाम्या जागी योग्य नामे लिहा.

(अ) कडाक्याची ........ पडली होती.

(आ) गिरणीचा ...... वाजू लागला.

(इ) टिळकांचे हाल पाहून पहारेकऱ्याला फार ....... झाले.

(ई) ..... ही भारताची राजधानी आहे.

६. (अ) खंड्याला लेखकाने मित्र म्हटले आहे. त्याला उद्देशून आणखी कोणते शब्द लेखकाने योजले आहेत ?

(आ) या पाठात 'चेहरा' या अर्थी 'मोहरा' हा शब्द आला आहे. असे इतर शब्द शोधून काढा व तुमच्या वहीत लिहून ठेवा.

(इ) तुमच्या घरी असलेल्या किंवा तुम्हांला आवडणाऱ्या एखाद्या पाळीव प्राण्याचे वर्णन लिहा.

---

# ९. धीवर पक्षी

तळ्याकाठी गाती लाटा,
लाटांमध्ये उभे झाड;
झाडावर धीवराची
हाले चोच लाल, जाड.

शुभ्र छाती, पिंगे पोट
जसा चाफा यावा फुली;
पंख — जणू थंडीमध्ये
बंडी घाले आमसुली.

जांभळाचे तुझे डोळे,
तुझी बोटे जास्वंदीची
आणि छोटी अखेरची
पिसे जवस-फुलांची.

गड्या, पाखरा, तू असा
सारा देखणा रे कसा ?
पाण्यावर उडताना
नको मारू मात्र मासा !



**शब्दार्थ व टिपा :** ******************************

**धीवर पक्षी** – खंड्या पक्षी. **अखेरची** – शेपटीची – टोकाची.

**वाकप्रचार :**

**फुली येणे** – फुलणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. धीवर पक्ष्याच्या देखणेपणाचे वर्णन तुमच्या शब्दांत करा.

२. या पक्ष्यामध्ये कवीला कोणकोणते रंग दिसतात ?

३. या पक्ष्याचे वर्णन करताना कवीने सुंदर सुंदर कल्पना केल्या आहेत. तुम्हांला कोणती कल्पना आवडली ते सांगा.

४. या पक्ष्याने कोणती कृती करू नये असे कवीला वाटते ? का ?

५. (अ) पाठातल्या चित्राप्रमाणे धीवर पक्ष्याचे चित्र काढा व त्यात रंग भरा.
   (आ) तुम्हांला आवडणाऱ्या एखाद्या पक्ष्याचे वर्णन वहीत लिहा.
   (इ) तुमच्या गावात निरनिराळ्या ऋतूंत कोणकोणते पक्षी येतात, त्यांची माहिती गोळा करा.

# १०. असे झुंजले वायुपुत्र

काही कथा अशा असतात, की त्यावर विश्वासच बसत नाही. पण अशी एक अशक्य वाटणारी घटना भारत-पाक युद्धात खरोखरच घडलेली आहे. भारतीय जवानांनी अशा अनेक अशक्य गोष्टी सहज शक्य करून दाखवल्या आहेत. भारतीय हवाईदलाच्या कामगिरीने तर जगाला अक्षरशः चकित केले आहे.

भारत-पाक युद्धात काही भारतीय विमाने शत्रूंच्या प्रदेशावर हल्ला करत होती. एका ताफ्यातील एक विमान चुकून शत्रूच्या विमानवेधी तोफेला बळी पडले. ते हवेतच पेटले आणि खाली आदळले. बाकीच्या विमानांनी ही खबर प्रमुख अधिकाऱ्यांना देताच त्यांना धक्का बसला.

विमानदलाचे एक मोठे अधिकारी त्या पाडलेल्या विमानात होते. त्यांचे काय झाले असेल ? मोठी चिंता निर्माण झाली. ते जिवंत असतील तर शत्रूच्या तावडीत सापडतील. जखमी झाले असतील तर... ? छे! काही कल्पना करता येत नव्हती.

परंतु असा विचार करण्यात वेळ न घालवता तातडीने निर्णय घेण्यात आला – कोणीतरी त्या ठिकाणी जाऊन पाहिले पाहिजे आणि ते जिवंत असतील तर त्यांना तेथून युक्तीने सोडवून आणले पाहिजे.

फ्लाइट लेफ्टनंट चंदनाणी यांना हा हुकूम मिळाला. ते भारतीय विमान अशा ठिकाणी पडले होते, की तेथे विमान नेण्याची सोय नव्हती. ते उतरवायला त्रास पडला असता. त्यापेक्षा हेलिकॉप्टर अधिक सोईचे. फ्लाइट लेफ्टनंट चंदनाणी हेलिकॉप्टरमधून निघाले. घाई करायला हवी होती.

शत्रूच्या त्या रणक्षेत्रात सगळीकडे शत्रू दबा धरून होता. हेलिकॉप्टर आकाशात दिसताच त्यांच्या विमानवेधी तोफा धडाडू लागल्या. शत्रूने चारही बाजूंनी मारा चालू केला. मोठ्या कौशल्याने तो मारा चुकवत फ्लाइट लेफ्टनंट चंदनाणी पुढे जाऊ लागले. भारतीय विमानांनी तेथे नुकताच हल्ला करून आगच आग लावून दिलेली होती. लष्करी वाहनांची व रणगाड्यांची पेटलेली धुडे सगळीकडे दिसत होती.

फ्लाइट लेफ्टनंट चंदनाणी यांना जे ठिकाण हवे होते ते आले; पण खाली आग व धूर यांशिवाय दुसरे काहीही दिसत नव्हते. फार खाली जाण्यात धोका होता. तरीही चंदनाणी यांनी मोठ्या धाडसाने आपले हेलिकॉप्टर खाली आणले. आपले भारतीय विमान जळत असलेले त्यांना दिसले.

त्यांनी ओळखले, की आता घाई करायला हवी. शत्रूच्या ध्यानात येण्यापूर्वीच सारी कामे आवरायला हवीत. त्यांनी मोठ्या कौशल्याने आपले हेलिकॉप्टर खाली उतरवले. जरा कानोसा घेतला. पाक विमानवेधी तोफेचा गोळा लागल्यावर ज्या विमानाने पेट घेतला होता, ते आडबाजूला जाऊन पडले होते. त्या विमानाचे पुढे काय झाले हे पाहायला शत्रूला वेळ नव्हता. त्याला वाटले होते – ज्या अर्थी विमान पेटले आहे, त्या अर्थी वैमानिक जळून मरणार! तेव्हा जाऊन पाहायचे कशाला ?

चंदनाणी त्या विमानाजवळ गेले. विमानाचे जळके भाग सगळीकडे विखुरलेले होते. त्या जळत्या अवशेषांत त्यांना वैमानिक पडलेला दिसला. तो केव्हाच मरण पावला होता. एवढ्यात त्यांना विव्हळण्याचा आवाज ऐकू

आला. पाहतात तो कॉकपिटमध्ये अजून कोणीतरी होते. तेच ते मोठे अधिकारी असावेत, म्हणून चंदनाणी चटकन पुढे गेले.

मोठ्या सावधगिरीने त्या जखमी अधिकाऱ्यांना उचलून हेलिकॉप्टरमध्ये ठेवले. ते अधिकारी भयंकर भाजलेले होते, पण अजून जिवंत होते.

एवढ्यात शत्रूला चाहूल लागली. जवळच्याच झाडीतून दहाबारा पाकिस्तानी सैनिक गोळ्या झाडत पुढे आले. पण ते जवळ येण्यापूर्वीच चंदनाणींचे हेलिकॉप्टर वर उडाले. मोठ्या साहसाने शत्रूचा मारा चुकवत त्यांनी ते वेगाने वर नेले. आता मुळीच कसली धास्ती नव्हती.



भारतीय हद्दीत तात्पुरत्या उभारलेल्या लष्करी इस्पितळाच्या आवारात फ्लाइट लेफ्टनंट चंदनाणी उतरले. लगेच त्या जखमी अधिकाऱ्यांना इस्पितळात नेले. त्यांच्यावर ताबडतोब उपचार सुरू झाले. शूरवीर चंदनाणी यांनी आपला जीव धोक्यात घालून एक प्राण वाचवला होता.

त्यांच्या या महान पराक्रमाला खरोखर तोड नाही!

**शब्दार्थ व टिपा :******************************

**अक्षरश:** – खरोखर. **हेलिकॉप्टर** – मोजक्या लोकांना सहजपणे वाहून नेणारे छोटे विमान. **कॉकपिट** – वैमानिकाची बसण्याची विमानातील जागा.

**प्रश्न व स्वाध्याय:**

१. भारतीय विमानदलाच्या प्रमुख अधिकाऱ्यांना धक्का का बसला ?

२. फ्लाइट लेफ्टनंट चंदनाणी यांच्यावर कोणती जबाबदारी येऊन पडली?

३. ती कामगिरी त्यांनी कशी पार पाडली हे थोडक्यात सांगा.

४. चंदनाणी यांच्या अंगी असलेले गुण वर्णन करणारे काही शब्द या पाठात आहेत. ते शोधा आणि ते शब्द वापरून चंदनाणीसंबंधी काही वाक्ये लिहा.

५. **व्याकरण:**

खालील वाक्ये वाचा.

(अ) **मी** दररोज पहाटे उठतो. (आ) **तू** उन्हात खेळू नकोस.

(इ) आकाशात विमान उडत होते. थोड्या वेळाने **ते** दिसेनासे झाले.

'मी', 'तू', 'ते' हे शब्द वरील वाक्यांत नामे नाहीत; पण त्यांचा उपयोग नामांसारखा झालेला आहे. जे शब्द नामांबद्दल वापरता येतात अशा शब्दांना सर्वनामे म्हणतात.

खालील वाक्ये वाचा आणि त्यांतील सर्वनामे ओळखा–

(अ) जखमी अधिकाऱ्यांना उचलून ठेवले. ते भयंकर भाजले होते.

(आ) सुनीता आईला मदत करते. ती गुणी मुलगी आहे.

(इ) बाबा, तुम्ही गावाहून कधी परत येणार ?

(ई) गोपाळचा पाय दुखावला होता. तो खेळू शकला नाही.

(उ) मी दररोज बागेला पाणी घालीन.

६. या पाठात युद्धासंबंधी काही शब्द वापरले आहेत. उदाहरणार्थ, शत्रू, हवाईदल, जवान इत्यादी. असेच या पाठातील व बाहेरचे आणखी शब्द गोळा करा आणि तुमच्या वहीत नोंदवून ठेवा.

# ११. झोप

पांडूतात्या हे आमचे जवळचे मित्र. त्यांचा झोपेचा प्रकार अगदी निराळा आहे. आम्ही त्यांना झोपाळू म्हणतो. ढेकणांनी त्यांची झोप कधी मोडली नाही, डासांनी ती कधी उडाली नाही आणि काळजीने तिला कधी मज्जावही केला नाही. भोजन व झोप यांमध्ये काही वेळ गेला पाहिजे असा नियम आहे. तो पाळण्याचे त्यांना कधी कारण दिसले नाही. जेवण झाल्याबरोबर झोपण्याची व उठल्याबरोबर जेवण्याची त्यांची नेहमी तयारी असते. फार जेवल्याने त्यांची झोप कधी बिघडली नाही आणि फार झोपल्याने त्यांची भूक कधी कमी झाली नाही.

ते खूप घोरत. त्यांच्या घोरण्यामुळे त्यांच्या जवळपासच्या माणसांचा कधी डोळ्यास डोळा लागत नाही. पण आपल्या घोरण्यामुळे त्यांची स्वतःची कधीच झोपमोड झाली नाही. त्यांच्या घोरण्याच्या आवाजात डासांचे गुणगुणणे लोपून जाते, त्याचप्रमाणे घड्याळाचा गजरही लोपून जातो. तात्यांचे घोरणे उच्च स्वरात चालत असते. त्या स्वरात कुत्र्यांचे भुंकणे व गस्तवाल्याची साद ही दोन्ही गडप होतात. त्या स्वरामुळे शेजाऱ्यापाजाऱ्यांस रात्रीच्या वेळी परस्परांशी ओरडूनच बोलावे लागते. भर उन्हाळ्यातही त्यांना घरांची सारी दारे व खिडक्या लावून व कानांत बोळे घालून निजावे लागते.

दुपारच्या झोपेच्या नियमाने कधी कधी पांडूतात्यांची फार गैरसोय होऊ लागली. तेव्हापासून तात्यांनी मनाचा एक निग्रह केला. झोपेसाठी ठराविक वेळ देण्यापेक्षा संधी मिळेल तेव्हा वाटेल तितका वेळ झोप घ्यावी असे त्यांनी ठरवले. आपल्या निग्रहाची त्यांनी जारीने अंमलबजावणीही सुरू केली.

आता त्यांची दिवसाची झोप दोनतीन तासांऐवजी पाचपाच, सातसात तास होऊ लागली. स्नेही मंडळींच्या गप्पा चालू असता त्यांच्यादेखत बसल्या बसल्या ते झोप काढू लागले. मधूनमधून ते ज्या डुलक्या घेत त्यामुळे त्यांच्या सोबत्यांना असे वाटे, की त्यांनी नुसते डोळे मिटून घेतले आहेत आणि त्यांचे गप्पागोष्टींकडे पूर्ण लक्ष आहे. इतकेच नव्हे तर ते मान हालवून मान्यताही



दाखवत आहेत. एखादया वेळी वाद भरास आला असता तात्या दोन्ही बाजूंच्या म्हणण्यास सारख्याच जोराने मान हालवताना दिसत. ते पाहून त्यांच्या निःपक्षपातीपणाबद्दल सर्वांना कौतुक वाटे.

आता रात्रीची जाग्रणे करण्यास तात्यांचा विरोध नाही. ते इतरांबरोबर गाण्याच्या बैठकीस जात आणि तिथे आपल्या घोरण्याने बाजाच्या पेटीची साथ करत. तात्या बैठकीस श्रोते म्हणून जात खरे; पण आपल्या घोरण्याने इतरांनाच श्रोते करून परत येत. मोठमोठ्या गवयांच्या पहाडी आवाजांचे त्यांच्या घोरण्यापुढे तेज पडत नसे.

आगगाडी पकडायची असली म्हणजे तात्यांच्या जीवाची धांदल तर विचारूच नका. जेवणानंतर लहानशी डुलकी आली, की सारा घोटाळा व्हायचा. या गाड्यांच्या वेळा नेहमी गैरसोईच्या. जेवण झाल्यावर जरा स्वस्थपण पडू म्हटलं तर सोय नाही. झोपेच्या वेळी गाडीनं स्टेशनावर येता कामा नये असा सरकारनं नियमच करावा' – असे ते म्हणत.

तात्यांना मोठ्या शिकस्तीने गाडी सापडली तर ते वेळेवर मुक्कामाला पोचतील याचा मुळीच नेम नसे. ते झोपेच्या भरात नेहमी मुक्कामाच्या पुढे दोनतीन स्टेशने जायचे. झालेल्या चुकीची दुरुस्ती करण्याकरता तिथे उतरून उलट दिशेने येणाऱ्या गाडीने परत यायला निघायचे; पण मुक्कामाच्या मागे दोनतीन स्टेशने गेल्यावर जागे व्हायचे! हा प्रकार घड्याळाच्या लंबकाप्रमाणे दोनतीन वेळा झाल्यावर मग कुठे त्यांना मुक्कामाचे ठिकाण दिसायचे!



एकदा ते मुंबईहून पुण्यास जाणाऱ्या गाडीची कल्याण स्टेशनवर वाट पाहत बसले असता— नव्हे, निजले असता त्यांच्या लागोपाठ तीन गाड्या चुकल्या. दर खेपेस गाडीने निघायची शिटी फुंकल्यावर तात्या जागे व्हायचे. तिच्यामागे धूम ठोकूनही ती हाती लागत नाही, हे कळून आल्यावर हात हालवत परत यायचे! पुढील गाडीस अजून अवकाश आहे, तितक्यात आणखी एक झोप काढण्यास हरकत नाही अशा भरवशावर ते पुन्हा लवंडायचे; पण पुन्हा तसेच घडायचे. तिसऱ्या खेपेस तर डोळ्यांवरची झापड पुरती उडालेली नसल्यामुळे ते गाडीच्या मागे धावायचे सोडून उलट दिशेलाच धावत सुटले! चौथ्या खेपेस गाडी सापडण्याचे कारण एवढेच, की त्यांनी गाडी येण्यापूर्वी आपल्याला उठवण्यासाठी हमालाला बजावले होते. उठायला उशीर लागल्यास 'जेवण तयार आहे' हा मंत्र कानात उच्चारायला त्यांनी त्याला मुद्दाम सांगितले होते.

तात्यांनी अलीकडे तर केव्हाही झोप यावी अशी सवयच जडवून घेतली आहे. ते बसून झोप घेतात, उभ्याने झोप घेतात, फार काय, पण चालतानाही झोप घेतात.

त्यांना पळत पळत झोप घेताना मात्र अजून कोणी पाहिलेले नाही!

**शब्दार्थ व टिपा :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**मज्जाव** - मनाई, बंदी. **गस्तवाला** - गावाला सावध ठेवण्यासाठी रात्री साद घालत हिंडणारा पहारेकरी. **निग्रह** - निश्चय. **निःपक्षपातीपणा** - कोणतीही एक बाजू न घेता न्याय देण्याची वृत्ती.

**वाक्प्रचारः**

**डोळ्यास डोळा न लागणे** - मुळीच झोप न येणे.

**प्रश्न व स्वाध्यायः**

१. पांडूतात्यांना कोणत्या दोन गोष्टी आवडत?

२. पांडूतात्यांच्या झोपेचा प्रकार निराळा होता असे का म्हटले आहे?

३. सभेस किंवा गायनाच्या बैठकीला गेल्यावर पांडूतात्यांच्या झोपेमुळे काय काय गमती होत ?

४. पांडूतात्या आगगाडीने प्रवासाला निघाले म्हणजे त्यांना कोणत्या अडचणी येत ?

५. या पाठात अनेक विनोदी प्रसंग आहेत. त्यांतील कोणता प्रसंग तुम्हांला अधिक आवडतो ते सांगा.

६. **व्याकरणः**

खालील वाक्ये वाचा.

(अ) **हा** पाहा माझा चेंडू. (आ) **जो** अभ्यास करील **तो** पास होईल.

(इ) **कोण** बोलत होते ? (ई) टेबलावर **काय** आहे ?

वरील वाक्यांतील जाड अक्षरांत असलेले शब्द 'मी', 'तू', 'ते',या शब्दांप्रमाणेच सर्वनामे आहेत.

रिकाम्या जागी योग्य सर्वनामे घालून पुढील वाक्ये वहीत लिहा–

(अ) तात्यांना पळत झोप घेताना अजून···· पाहिलेले नाही.

(आ) ताईजवळ दोन चित्रे होती. ....रंगीत होते. ..... तिने मला दिले.

(इ) तुझ्या हातात····आहे ?

(ई) नाटकात····काम करणार ?

(उ) ····माझी नवी मैत्रीण आहे.

७. (अ) डोळ्यास डोळा न लागणे, धूम ठोकणे, गडप होणे, जीवाची धांदल उडणे या शब्दसमूहांचा उपयोग करून नवी वाक्ये तयार करा.

(आ) 'झोप' पासून 'झोपाळू' हा शब्द तयार होतो. तसे खालील शब्दांपासून नवे शब्द बनवा.

माया, कृपा, पाय, दया, विसर.

## १२. जीवघेणा प्रसंग

आमच्या घरात आम्ही तिघी बहिणी बरोबरीच्या. आमच्या लग्नाबद्दल आईवडिलांना चिंता वाटे. ते सारखे काळजी करत. म्हणून निदान त्यांना आनंद होईल असं आपण वागावं असं मी ठरवलं. तशी मी घरात फारसं काम करत नसे, पण आता कामाला लागले. भावंडांनाही तसं सांगितलं.

एके दिवशी जेवणानंतर भावंडांना घेऊन मी शेतातल्या झोपडीवर गेले. त्यांच्या मदतीनं झोपडी झाडून-सारवून स्वच्छ केली. बिछाने, रजया कुठं कुठं फाटल्या होत्या त्या शिवून, तुरपून ठीक केल्या. चादरी धुण्यासाठी विहिरीवर गेले.

ही विहीर शेजारच्याच शेतात असून चांगली ऐसपैस होती. मला चक्रीवरून विहिरीचं पाणी काढता येत होतं. चक्रीशिवाय दोन्ही हातांनी आळीपाळीनं दोर धरून पाणी शेंदायलाही येत होतं. या विहिरीवर रहाट होता. तो मात्र मी कधीच ओढला नव्हता. पण मी विहिरीत पोहरा तर सोडला. तो झपाट्यानं सरसर विहिरीत जाऊ लागला. रहाट एवढ्या जोरानं फिरू लागला, की तो कसा थांबवावा हे मला समजेना. रहाटाच्या खुंट्या तर दिसत नव्हत्याच, पण निदान एखादी हाती येईल म्हणून मी हात पुढं केला. खुंटी हाती लागण्याऐवजी माझ्या हातातील चुडा मात्र फुटून त्याचे तुकडे तुकडे झाले. हे इतकं झटपट घडलं, की काय करायचं हे कळण्यापूर्वीच मी दोर धरला. एकदम एक हिसडा बसला अन्‌ त्याच क्षणी माझे पाय उचलले गेले. डोळ्याचं पातं लवतं न लवतं तोच मी धाडकन विहिरीत पडले. धुडूम-धप्प....जोरानं पाणी उसळलं. मला चांगलं आठवतं – चहूबाजूंनी पाणी वर उसळून जणू एक कमळच बनलं आणि मला पोटात घेऊन ते मिटलं.

पडताना मी ओरडले,"भाऊ, भाऊ !"

विहिरीशेजारीच झोपडी होती खरी, पण तिथून इथं यायला चालून यावं लागे. माझी आरोळी ऐकून माझा छोटा भाऊ मधल्या बाभळीच्या काटेरी

कुंपणातून धडपडत आला. मागोमाग बहीण सगुणाही आली. दोन्ही भावंडं विहिरीच्या थारोळ्यावर उभी राहिली.

पाण्याच्या पोटात दोनदा जाऊन आल्यावर आता मी सावरले होते. जो दोर धरून मी पडले तो दोर मी अजूनही गच्च धरून ठेवला होता. दोर पोहऱ्याला जसा बांधलेला होता, तसाच वर रहाटालाही बांधलेला होता. विहिरीला पायऱ्या नव्हत्या, पण मधूनमधून कपारी होत्या. त्यांपैकी एक मला गवसली होती आणि तिच्यावर मी पाय टेकला होता. दोन्ही हातांत दोर धरून मी विहिरीत लोंबकळत राहिले होते.

इकडं दोन्ही भावंडं थारोळ्यावर उभी राहून रडत-ओरडत होती. शेवटी सगुणेनं सल्ला दिला, "भाऊ, तु उडी घे आणि अनुताईला बाहेर काढ."

वास्तविक भाऊ तिच्यापेक्षा चार वर्षांनी लहानच. त्यानं धोतराचा काचा मारला. तो उडी घेणार, तोच मी ओरडून सांगितलं, "नको नको, उडी मारू नकोस. पलीकडं शेतान जा. लोकांना घेऊन ये. तोवर मी बुडणार नाही. जा."

धावतच मुलं गेली आणि त्या विहिरीत मी एकटी राहिले.



आता कुठं माझं लक्ष माझ्या सभोवताली गेलं. मी पाहिलं नि मला धक्काच बसला. अरे बापरे! जवळचं पाणी तांबूस दिसत होतं. माझ्या अंगात लांब बाह्यांचं पोलकं होतं. त्याच्या हातोप्यांवर तांबूस डाग होते. हातांवर रक्ताचे ओघळ होते!

म्हणजे ? हे रक्त कुठून आलं ? मी हातांकडं पाहिलं. माझ्या बोटांच्या आणि तळहातांच्या चिंधड्या झाल्या होत्या. दोन्ही हातांचं मास दोरीनं घासल्यामुळं निघालं होतं. आतलं हाड पांढरट दिसत होतं. तशा त्या हातांत तो काथ्याचा जाड, चरबट दोर मी आतापर्यंत धरून ठेवला होता!

पण आता मला तो धरवेना. माझ्या तळव्यांची आग आग होऊ लागली. आपल्याला अशा दुखऱ्या हातांत दोर धरवणार नाही, आता आपली धडगत नाही, असं मला वाटलं.माझ्या एकाच पायाला आधार मिळाला होता. तोल सावरण्यासाठी दोर धरून ठेवणं अगदी आवश्यक होतं; पण मनानं अशी कच खाल्ल्यावर ते अशक्य वाटू लागलं. फार वेळ आपला निभाव लागणार नाही, आपली शंभर वर्षं भरली, असे विचार मनात आले. मी हताश होऊन डोळे मिटले.

हाताला कोण रग लागली होती! डोळे उघडून पाहते तो एक लहानशी गोल सावली विहिरीत पडल्याचं दिसलं. मी सहजच वर पाहिलं. एक छोटासा गोरा गुबगुबीत चेहरा विहिरीत डोकावत होता. चेहरा ओळखीचा होता. झोपडीकडं येता-जाताना या मुलाचं घर वाटेत लागत असे. तो एवढासा लहान मुलगा विहिरीत डोकावून मला धीर देत होता– "लोक येताहेत. घाबरू नको. दोर तोंडात धर."

मला हे सुचलंच नव्हतं. लगेच ती सूचना मी अमलात आणली. हातातला दोर मी तोंडात धरून ठेवला.

काही वेळानं गोंगाट करत लोक आले. माझी ती स्थिती पाहून एका तरुण माणसानं ताबडतोब विहिरीत उडी घेतली. त्या माणसानं माझ्या तोंडातली दोरी आपल्या हातात घेतली अन् दुसऱ्या हातानं माझा दंड पकडून ठेवला.

लगेच एक पाळणा खाली सोडण्यात आला. त्या माणसानं मला पाळण्यात



बसवलं. लोकांनी पाळणा वर ओढून घेतला. तिसऱ्या प्रहरी मी पाण्यात पडले होते; सूर्यास्तापूर्वी मला वर काढलं.

माझ्या आईचा आक्रोश दुरून कुठून तरी ऐकू आला; पण पुढचं काहीच कळलं नाही.

डोळे उघडले, तेव्हा मी झोपडीत खाटेवर होते. शेजारीच डॉक्टर उभे होते. त्यांचे शब्द कानांवर आले, "बहाद्दूर आहे मुलगी ! "

**शब्दार्थ व टिपा** : ******************************

**तुरपणे** - वस्त्राचे काठ दुमडून शिवणे. **चक्री** - पाणी शेंदण्यासाठी विहिरीवर बसवलेले छोटे चाक. **पोहरा** - विहिरीतून पाणी काढण्याचे एक प्रकारचे भांडे. **थारोळे** - डोण, मोटेचे पाणी ज्यात पडते अशी रुंद खळगी.

**वाक्प्रचार :**

**धडगत नसणे** - आशा न उरणे. **कच खाणे** - नाउमेद होणे; भीतीने माघार घेणे. **निभाव लागणे** - टिकाव धरणे; तग धरणे. **शंभर वर्षे भरणे** - मृत्यू येणे; कोणत्याही गोष्टीची अखेर होणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. घरातील कामात मदत करावी असे लेखिकेला का वाटले ?

२. लेखिका विहिरीत पडायला कोणते कारण घडले ?

३. विहिरीत पडल्यावर तिचे लक्ष कोणकोणत्या गोष्टींकडे गेले ?

४. लेखिकेला वाचवण्यासाठी त्या लहान मुलाने कोणती युक्ती सुचवली ?

५. या पाठात वर्णन केलेल्या प्रसंगातून लेखिकेच्या अंगचे कोणकोणते गुण दिसतात ?

६. 'पाणी जणू एक कमळच बनले' असे का म्हटले आहे?

७. **व्याकरण:** पुढील वाक्ये वाचा.

(अ) **छोटा** भाऊ **काटेरी** कुंपणातून धडपडत आला.

(आ) **एक लहानशी** सावली विहिरीत पडली.

(इ) **गोरा गुबगुबीत** चेहरा विहिरीत डोकावत होता.

पहिल्या वाक्यात 'छोटा' या शब्दाने 'भाऊ' या नामासंबंधी आणि 'काटेरी' या शब्दाने 'कुंपण' या नामासंबंधी विशेष माहिती मिळते. दुसऱ्या वाक्यात 'एक', 'लहानशी' या शब्दांनी 'सावली' या नामाबद्दल विशेष माहिती मिळते. तिसऱ्या वाक्यात 'गोरा', 'गुबगुबीत' या शब्दांनी 'चेहरा' या नामाबद्दल विशेष माहिती मिळते.

नामाबद्दल विशेष माहिती सांगणारा शब्द म्हणजे विशेषण.

खालील वाक्यांतील विशेषणे ओळखा आणि ती कोणत्या नामांसंबंधी माहिती देतात ते सांगा.

(अ) तो हिरव्या झाडाची फांदी तोडत नसे.

(आ) गाईची जाड खरखरीत जीभ माझ्या हातावरून फिरली.

(इ) ते एक लहान पिलू होते.

(ई) आम्ही गुऱ्हाळात ताजा व गोड रस प्यालो.

(उ) जत्रेला खूप लोक आले होते.

८. (अ) 'डोळ्याचं पातं लवतं न लवतं तोच', या शब्दसमूहाचा अर्थ 'अगदी थोड्या वेळात' असा आहे. अशा शब्दसमूहाला वाक्प्रचार असे म्हणतात. या वाक्प्रचाराचा उपयोग करून दोन वाक्ये तयार करा.

(आ) 'तांबूस' हा शब्द 'तांबडा' या रंगाची फिकट छटा दाखवणारा आहे. खालील शब्दांपासून रंगांच्या फिकट छटा दाखवणारे शब्द तयार करा.
काळा, पांढरा, पिवळा, लाल, निळा.

(इ) अशा प्रकारचा एखादा प्रसंग तुमच्या पाहण्यात, ऐकण्यात किंवा अनुभवात असेल तर तो वर्गसभेत सांगा.

---



# १३. इथे

आम्रतरू हा धरी शिरावर प्रेमळ निज साउली,
मृदुल, कोवळी, श्यामल हिरवळ पसरे पायांतळी
आणिक पुढती झरा खळाळत खडकांतुन चालला,
साध्या, भोळ्या गीतामध्ये अपुल्या नित रंगला!

काठी त्याच्या निळी लव्हाळी, डुलती त्यांचे तुरे,
तृणांकुरांवर इवलाली ही उडती फुलपाखरे!
खडा पहारा करिती भवती निळेभुरे डोंगर,
अगाध सुंदर भव्य शोभते माथ्यावर अंबर!

दुर्मिळ ऐशी देइ शांतता सदा मला हे स्थल,
ऐकु न येई इथे जगाचा कर्कश कोलाहल.
व्याप जगाचा विसराया मी येइ इथे सत्वर,
अर्ध्यामिटल्या नयनी बघते स्वप्ने अति सुंदर!

शांतविले मी तप्त जिवाला इथे कितीदा तरी;
कितिदा यावे तरी येथली अवीट ही माधुरी!

**शब्दार्थ व टिपा :** ************************************

**श्यामल** - गर्द, दाट हिरवी. **व्याप** - ताप, पसारा. **कोलाहल** - गडबड, गलबला.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. कवयित्री या स्थळी का येते ?
२. ओढ्याचे वर्णन तुम्ही तुमच्या शब्दांत करा.
३. कवयित्री कोणती स्वप्ने बघत असावी असे वाटते ?
४. (अ) झऱ्याच्या आवाजाला 'खळखळाट' म्हणतात. हा शब्द नादाचे अनुकरण करणारा आहे. पुढील वस्तूंच्या आवाजाला नादानुसारी शब्द सांगा.
   १. ढग. २. वीज. ३. पंख. ४. यंत्र.
   (आ) 'मृदुल', 'कोवळीं', 'श्यामल' हे शब्द 'हिरवळ' या नामाची विशेषणे आहेत. या कवितेत आलेल्या पुढील नामांना कोणती विशेषणे लावली आहेत ?
   साउली, गीत, लव्हाळी, डोंगर, कोलाहल, जीव, माधुरी, फुलपाखरे, स्वप्ने.

---

# १४. नवा वसा

आटपाट नगर होतं.

तिथं भाऊ टोलेजंग वाड्यात राहत होता. बहीण राहत होती लहानशा झोपडीत. भाऊ होता श्रीमंत. बहीण होती गरीब.

भावानं एकदा मोठी मेजवानी दिली. त्यानं सगळ्यांना बोलावलं. बहिणीला बोलावलं नाही. बहिणीला वाटलं, घाईगर्दीत भाऊ विसरला असेल. आपल्या भावाच्याच घरचं जेवण आहे. आमंत्रण नसलं म्हणून काय झालं ? कशाला बघायची आमंत्रणाची वाट ? इतके लोक येणार, आपणही जावं.

रंगीबेरंगी पताकांनी आणि फुलांच्या माळांनी टोलेजंग वाडा सजवला होता. स्वत: भाऊ दारात हात जोडून उभा होता. येणाऱ्यांचं हसून अगत्यानं स्वागत करत होता. 'या, बसा.' म्हणत होता.

सगळे लोक आले. जेवणासाठी पाटांवर येऊन बसले. बहीण मात्र कोपऱ्यातच उभी. सगळे जेवणाच्या गडबडीत. कुणाचं तिच्याकडं लक्षच

नव्हतं. भावाची नजर आपल्याकडे आता जाईल, मग जाईल, असं तिला वाटलं.

पण भावानं पाहूनही न पाहिल्यासारखं केलं.

बहीण हिरमुसली.

पक्वान्नांचा घमघमाट येत होता. कुणीच तिच्याकडं बघत नव्हतं. वाट पाहून पाहून बहीण थकली. कुणीच बोलावत नाही असं पाहून ती तिथंच एका रिकाम्या पाटावर बसली. घास घेणार, तोच भावाची तिच्याकडं नजर गेली.

"कोण ग तू ? इथं कशाला आलीस ?" त्यानं विचारलं.

"दादा, मला नाही ओळखलंस ? मी तुझी बहीण."

"बहीणबिहीण ओळखत नाही. तुला काही मी आमंत्रण दिलं नाही."

"आपलंच घर म्हणून आलेय. घरच्या माणसानं का आमंत्रणाची वाट बघत थांबायचं ? घरच्यांशी कसला मानपान ?"

"तू दळभद्री आहेस. माझे मित्र मला हसतील. त्यांचे भरजरी कपडे बघ. नाहीतर तुझे — नुसत्या चिंध्याच !"

"असू दे, दादा. मला नाही त्याचं काही वाटत."

"अग, पण माझा अपमान होतो. ऊठ आधी."

एवढ्यात पंगतीतला एकजण म्हणाला, "भरल्या ताटावरून असं कुणाला उठवू नये."

बहिणीला वाईट वाटलं. ती खट्टू झाली. न बोलता, न जेवता बिचारी घरी गेली.

तिच्या मनात एकच विचार सुरू झाला. — 'हे असं का ?'

शेजाऱ्णीला पुसलं. थोरामोठ्यांना विचारलं – असं का घडावं ? भावानं असं का करावं ?

कुणीतरी सांगितलं, "बाई, बाई, दळिद्र गेलं पाहिजे. दिवस पालटले पाहिजेत."

"दळिद्र कसं जाईल ?"

"बाई, बाई, वसा घे."

"कसला वसा घेऊ ?"

"वसा घे कामाचा. वसा घे श्रमाचा. रिकामं कधी बसायचं नाही. आळसात वेळ घालवायचा नाही. घेतला वसा टाकायचा नाही. दिला शब्द मोडायचा नाही."

बहिणीनं वसा घेतला. रिकामी कधी बसली नाही. दिवसा झोप घेतली नाही. आळस टाकून कामाला लागली.

दिसामाशी स्थिती पालटली. गरिबी गेली. घराला नवी कळा आली. घर धनधान्यानं भरून गेलं. मुलंमाणसं सुखावली. पैपाहुणे येऊ लागले. लोक मानानं बोलवू लागले.

एक दिवस भाऊही घरी आला. मनमोकळं बोलला, हसला. अगत्यानं भोजनाचं निमंत्रण देऊन गेला.

बहीण येणार म्हणून वाडा सजवला. केळीची पानं. पानांपुढं रांगोळी. रंगीत सुंदर पाट. उदबत्तीचा घमघमाट. काय वर्णावा थाट!

भाऊ दारात उभा होता. बहीण दिसताच पुढं झाला. हसतमुखानं स्वागत केलं.

बहीण आत आली. न बोलता उभी राहिली. जुना प्रसंग आठवला.

ती पाटाजवळ गेली. सरी काढली, पाटावर ठेवली. कंठा काढला, पाटावर ठेवला. गोठ काढले, पाटावर ठेवले. पाटल्या काढल्या, पाटावर ठेवल्या. तोंडे काढले, पाटावर ठेवले. कुडी काढली, पाटावर ठेवली. नथ काढली, पाटावर ठेवली.

भाऊ म्हणाला, "ताई, ताई, हे काय करतेस ?"

ऐकलं न ऐकलंसं करून ती एकेक घास दागिन्यांवर ठेवू लागली. लाडवाचा घास सरीवर, जिलबीचा घास गोठावर, पुरणाचा घास नथीवर...

भावाला काही कळेना. तो म्हणाला, "ताई, जेव ना."

"हो, तेच करतेय ना. तू ज्यांना जेवायला बोलवलंयस. त्यांना आधी भरवते."

भाऊ गोंधळला. त्याला काही कळेना.



बहीण म्हणाली, "भाऊराया, तु मला नाही बोलावलंस, बोलवलंयस या दागिन्यांना — माझ्या श्रीमंतीला."

भाऊ ओशाळला. कसाबसा म्हणाला, "ताई, ताई, मला माफ कर. मागं मी चुकलो. आता मी शिकलो. पुन्हा असं वागणार नाही. कुणाला कमी लेखणार नाही."

बहीण म्हणाली, "अरे, माणसाचे दिवस सारखेच नसतात. त्या दिवशी तुझ्याकडं धडा शिकले. कामाला लागले आणि दिवस पालटले."

भाऊ म्हणाला, "ताई, ताई, चांगलं केलंस. माझ्या डोळ्यांत अंजन घातलंस. आजपासून वसा घेईन. तुझा वसा सर्वांना सांगेन. म्हणेन — उतू नका, मातू नका. कामाचा आळस करू नका. खोटा गर्व धरू नका. माणुसकीला विसरू नका. कोणाला हीन लेखू नका."

साठा उत्तराची कहाणी, पाचा उत्तरी सफळ संपूर्ण.

**शब्दार्थ व टिपा :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**अगत्य** – आस्था; कळकळ. **हिरमुसणे** – विरस होणे; निराश होणे. **दळभद्री** – दरिद्री; दुर्दैवी. **दिसामाशी** – दिवसेंदिवस. **ओशाळणे** – खजील होणे.

वाक्प्रचार :

**डोळ्यात अंजन घालणे** – स्पष्टपणे चूक दाखवणे.

**टीप :** 'साठा उत्तराची कहाणी, पाचा उत्तरी सफळ संपूर्ण'— जे महत्त्वाचे व सविस्तर सांगायचे असते ते अगदी थोडक्यात सांगितलेले आहे, अशा अर्थाच्या या शब्दांनी कहाणीचा शेवट करतात.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. भावाने बहिणीला जेवायला का बोलावले नाही ?
२. आमंत्रण नसतानाही बहीण भावाकडे जेवायला का गेली ?
३. बहीण आल्याने आपला अपमान होतो, असे भावाला का वाटले ?
४. बहिणीने कोणता वसा घेतला ?
५. बहिणीने भावाच्या डोळ्यांत अंजन कसे घातले ते सांगा.
६. ऐकलं न ऐकलंसं करून – म्हणजे ऐकूनही दुर्लक्ष करून. या धर्तीचा आणखी एक शब्दसमूह याच पाठात आहे. तो शोधा आणि या शब्दसमूहांचा उपयोग करून काही नवी वाक्ये तयार करा.
७. **व्याकरण :**

पुढील वाक्ये वाचा.

(अ) **माझ्या** डोळ्यांत अंजन घातलंस.
(आ) आज आपण **चौदावा** पाठ वाचला.
(इ) लेफ्टनंट चंदनाणी यांनी **आपला** जीव धोक्यात घातला.
(ई) मी खिशात **काही** पैसे ठेवले.

या वाक्यांतील 'माझ्या', 'चौदावा', 'आपला', 'काही' हे शब्द बाराव्या पाठात आलेल्या 'छोटा', 'काटेरी', 'एक', 'लहानशी' इत्यादी शब्दांप्रमाणेच विशेषणे आहेत.

१. पुढील विशेषणे खाली दिलेल्या वाक्यांत योग्य जागी लिहा.

**विशेषणे :** सात, तिचे, पाचव्या, आपल्या, काही.

वाक्ये : (अ) सर्वांची जेवणे झाली, .......जेवण मात्र अजून झाले नव्हते.
(आ) पुस्तकात पुष्कळ चित्रे आहेत. त्यांतील........रंगीत आहेत.
(इ) ........वारांचा आठवडा होतो.
(ई) पुढील वर्षी आम्ही........इयत्तेत जाऊ.

२. पुढे काही नामे दिली आहेत. त्यांच्यासाठी योग्य विशेषणे वापरा.

आकाश, पाणी, कारले, उदबत्ती, महिने, सैनिक, आई.

---

# १५. आभाळाचा निरोप

गोष्ट आहे फार फार वर्षांपूर्वीची. जशी जुनी तशीच गमतीची. तेव्हा फुलांना विविध रंग नव्हते. गुलाबाचे फूल पांढरे होते. सोनचाफाही पांढराच. पांढरी होती जास्वंदी अन् चमेलीही पांढरीच. सगळी फुले पांढरीच होती; पण होती सगळी सुगंधी. प्रत्येकाला वेगळा गंध होता. गुलाबाचा सुगंध. रातराणीचा सुगंध. जाईचा अन् जुईचा. मोगऱ्याचा अन् केवड्याचा. वेगवेगळे पण मनाला मोह घालणारे सुगंध.

अनेक प्रकारचे सुवास हवेत दरवळत असत. वाऱ्यावर तरळत असत. डोंगरदऱ्यांतून घमघमत असत. मुलामाणसांना, लहानथोरांना, पशुपक्ष्यांना सुखवत असत. पहाटे मंद वाऱ्याच्या झुळका येत. फुलांचा गंध तरंगत येई. मुले आनंदाने नाचू लागत. म्हणत, 'फुलांना किती छान छान वास!' पक्षी किलबिलत. जणू म्हणत, 'फुलांना किती छान छान वास!'

आभाळाला मग वाईट वाटे. त्याला फुलांचा राग येई. पहाटे त्याला ऐकावे लागे-'फुलांचा वास किती छान छान!' आभाळ खूप चिडे. चिडून लालेलाल होई. लाल, गुलाबी, नारिंगी, केशरी, पिवळे, निळे, जांभळे असे खूप रंग आभाळात गोळा होत. आभाळ खूप खुलून दिसे. सुंदर दिसे पूर्वदिशा. आभाळ आपल्यावरच खूश होई. स्वतःशीच आनंदून म्हणे, 'फुलांना वास असेल... पण माझ्यासारखे रंग कुठं आहेत ?'

एकदा पहाटे गंमत झाली. एका कोंबड्याला जाग आली. वारा मंद वाहत होता. फुलांचा गंध पसरला होता. कोंबड्याला खूप आनंद झाला. मान उंचावून, आभाळाकडे तोंड करून कोंबडा आरवला, 'कुकूऽचकूऽऽ कुकू ऽऽचकूऽऽ,आनंदानं नाच करू. सगळे मिळुनी गाऊ गान. फुलांचा वास किती छान!'

आभाळाला वाटले, कोंबडा आपल्यालाच चिडवतोय. ते कोंबड्यावर ओरडले, "तुम्ही सगळे आहात वेडेच. माझ्यासारखे सुंदर रंग फुलांना मिळणार आहेत थोडेच! धडाऽड धूम, धडाऽऽड धूम..."



कोंबडा पळत दूर गेला. दूर जाऊन पुन्हा ओरडला, "फुलांचा वास कित्ती छान! कित्ती छान!"

आभाळाने खूप विचार केला. चिडून, रागावून चालणार नाही. कुणाला तरी फुलांकडे पाठवायचे. गुपचूप विचारायचे — इतके सुगंध तुम्ही आणले कुठून ?

एवढ्यात आभाळात एक ढग आला. काळा-काळाकुट्ट. एक, दोन, तीन, चार... खूप खूप ढग जमा झाले. सगळे पाण्याने भरलेले. आभाळाने रंग आवरून घेतले. काळ्या ढगांना हळूच म्हटले, "तुम्ही माझे मित्र खरे. मला मदत करा बरे. आज तुम्ही पाऊस पाडा. पाण्याच्या धारा जमिनीवर सोडा. माझे रंग सोबतीला देतो. धारांबरोबर ते फुलांवर उतरतील. सुगंध कुठून आणला विचारून घेतील. जलधारांना धरून माझे रंग वर येतील. फुलांचं रहस्य मला कळेल. मलाही मग सुगंध मिळेल. मग माझ्याजवळ रंग असतील. माझ्याजवळ गंध असतील."

ढगांनी आभाळाचे म्हणणे ऐकले. काही रंगांना सोबत घेतले. रंगीत सरी खाली आल्या. फुलाफुलांवर रंग उतरले.

एवढ्यात काय झाले – रात्र झाली. ढगांतले पाणी संपून गेले. रंगांना आभाळाकडे जाता नाही आले.

सकाळ झाली. सगळ्यांना नवल वाटले. अशी काय जादू झाली ? फुले रंगीत कोणी केली ? काल फुले पांढरी होती. आज रंगीत कशी झाली ?

रंगीत रंगीत फुले. छान छान फुले. लाल गुलाब, गुलाबी गुलाब. हिरवा-चाफा; पिवळा चाफा, भगवी जास्वंदी, फिकट लाल कर्दळी. किती किती रंग अन् त्यांच्या किती किती छटा !

पण सर्व फुले रंगीत नाही झाली. काही तशीच पांढरी राहिली. रंग भेटायला आले तरी ती झोपूनच राहिली. रंगांची देणगी नाहीच मिळाली. जाई, जुई, मोगरा, निशिगंध आणि अशीच आणखी काही फुलं तशीच राहिली.

फुलांजवळ गंध होतेच. आता त्यांना रंग मिळाले. आभाळाने खाली पाहिले. विविध रंगी फुले कशी आनंदाने डोलत होती.

आभाळाने ढगांना बोलावले. त्यांना म्हटले, "मला फुलांचा सुगंध नको, पण माझे रंग मला परत आणून द्या."

रंग परत आणणे ढगांना काही जमेना आणि गंधांचे रहस्य काही उलगडेना.

आभाळ फार कष्टी झाले. त्याने कोंबड्यांना सांगितले, पोपटांना सांगितले, सर्व पक्ष्यांना सांगितले, "फुलांना माझा निरोप सांगा— म्हणावं, मला तुमचा गंध नको. माझे रंग मला परत करा."

पण कोणीच त्याचे ऐकेना. फुलांना निरोप देईना.

आभाळाला मग फुलपाखरे दिसली. फुलांची व त्यांची दोस्ती आठवली. आभाळाने फुलपाखरांना म्हटले, "मी दुःखी आहे. मी कष्टी आहे. माझं दुःख दूर कराल ?"

सर्व फुलपाखरे एकदम म्हणाली, "जरूर करू, जरूर करू."

आभाळ म्हणाले, "तुम्ही फुलांना एवढंच सांगा, मला तुमचा गंध नको. माझे रंग परत करा."

फुलपाखरे म्हणाली, "तुझा निरोप अवश्य सांगू. जोवर फुलं ऐकत नाहीत, रंग परत करत नाहीत, तोवर त्यांना रोज भेटू. रोज त्यांना निरोप सांगू."

आभाळाला हायसे वाटले. ते रंगांची वाट पाहत राहिले.

तेव्हापासून आजपर्यंत फुलपाखरे फुलांना भेटत आहेत. आभाळाचा निरोप सांगत आहेत. फुले काही बोलत नाहीत. रंग परत करत नाहीत. आभाळाचे वाट पाहणे काही संपत नाही.



**शब्दार्थ व टिपा :** ****************************

**रहस्य** - इंगित; गुप्त गोष्ट.

**वाक्प्रचार :**

**हायसे वाटणे** - मनावरचे दडपण नाहीसे होणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. आभाळाला कशाची उणीव जाणवत होती ?

२. गंधांचे रहस्य समजून घ्यायला आभाळाने कोणती युक्ती केली ?

३. त्या युक्तीचा फायदा कोणाला व कसा झाला ?

४. काही फुले पांढरीच का राहिली ?

५. आभाळाचा निरोप फुलांना कोणी सांगितला ? तो निरोप कोणता ?

६. आभाळ आपल्या रंगांची वाट पाहतच राहिले, ते का ?

७. (अ) समानार्थी शब्द लिहा.

आभाळ, वारा, फूल, दिवस, पाणी, ढग.

(आ) 'पक्ष्यांना' या शब्दातील मूळ शब्द 'पक्षी' हा आहे. 'पक्ष्यांना' या शब्दात 'क्ष्या' असे उच्चारले जाते. मात्र मूळ शब्द जर 'पक्ष' असला तर 'पक्षांना' असे उच्चारले जाते.

खालील शब्दांपासून 'पक्ष्याला', 'पक्ष्यांना' यांसारखे शब्द तयार करा. ते योग्य पद्धतीने उच्चारा व त्यांचे तसेच लेखन करा :

मंत्री, मणी, गवळी, वाणी, माळी, कोळी.

व्याकरण :

पुढील वाक्ये वाचा.

(अ) सूर्य पूर्वेला **उगवतो.**

(आ) पहाटे कोंबडा **आरवला.**

(इ) फुलपाखरू आकाशाला म्हणाले, "मी तुझा निरोप **सांगेन.**"

पहिल्या वाक्यातील 'उगवतो' या शब्दाने सूर्य काय करतो हे कळते आणि वाक्याचा अर्थ पूर्ण होतो. दुसऱ्या वाक्यातील 'आरवला' या शब्दाने कोंबड्याने काय केले हे कळते आणि वाक्याचा अर्थ पूर्ण होतो. तिसऱ्या वाक्यातील 'सांगेन' या शब्दाने फुलपाखरू पुढे काय करणार आहे हे कळते आणि वाक्याचा अर्थ पूर्ण होतो.

'उगवतो', 'आरवला', 'सांगेन' या शब्दांनी क्रिया कळते आणि त्या त्या वाक्याचा अर्थ पूर्ण होतो. अशा शब्दांना क्रियापदे म्हणतात.

१. खालील वाक्यांतील क्रियापदे ओळखा.

(अ) तिने नथ पाटावर ठेवली. (आ) संध्याकाळी आम्ही मैदानावर खेळतो.

(इ) सुटीत मुले सहलीला जातील. (ई) पौर्णिमेच्या रात्री समुद्राला भरती येते.

२. रिकाम्या जागी योग्य क्रियापदे लिहून वाक्ये पूर्ण करा.

(अ) मी उद्या गावाला........ (आ) कालच्या समारंभात त्याला बक्षीस........

(इ) आई मुलांवर प्रेम........

---

# १६. वन्दे मातरम् !

संध्याकाळची घंटा झाली की वाटे, सुटलो. आता केवळ झोप! गाढ सुख! दुःखाचा एक दिवस संपला. सुटका एका दिवसानं जवळ आली.

एक दिवस संध्याकाळची घंटा झाली; मी तेलगोदामाला कुलूप लावलं. किल्ली मोठ्या जमादाराच्या हाती परत देऊन आपल्या कोठडीकडं चाललो. इतक्यात बाहेरून परत आलेल्या एका वॉर्डरनं माझ्या हातात गुपचूप एक चिठ्ठी दिली. मोठ्या आनंदानं हसून, 'बातमी चांगली आहे,' असं म्हणत तो चटकन निघून गेला. मी चिठ्ठी उघडून पाहिली. तिच्यात लिहिलं होतं — सावरकरबंधूंना हिंदुस्थानात परत धाडा, अशी सरकारची आज्ञा कारागृहाच्या कार्यालयात आली आहे.



मागं अशा बातम्या पन्नासदा उठल्या आणि विरल्या. पण आम्ही बंधू अंदमानातच राहिलो. चिठ्ठी लिहिणाऱ्या आमच्या त्या मित्राला हे माहीत होतं, म्हणून त्यानं लिहिलं होतं — 'बातमी खरी आहे. मी आज्ञा प्रत्यक्ष पाहिली.'

असेल, आता ही बातमी खरीही असेल. सकाळी कारागृहातील अधिकाऱ्यांनीही मला बोलावून 'तुमची पुस्तकं वगैरे सामान बांधून ठेवा,' असं सांगितलं होतं. तेव्हा आता बहुधा आम्हांला हिंदुस्थानात पाठवलं जाणार, हे निश्चित दिसू लागलं.

आम्हांला कारागृहात पुन्हा बंद करण्यासाठीच हिंदुस्थानात पाठवलं जाणार होतं. पण हे रहस्य अंदमानातल्या लोकांच्या ध्यानात न आल्यामुळं 'सावरकर सुटणार' अशीच बातमी सगळीकडं पसरली. लोकांनी आमच्यावर अभिनंदनाचा पाऊस पाडण्यास आरंभ केला.

पण मला मात्र उदास वाटू लागलं. अंदमानच्या कारागृहात निदान एकतरी सुख होतं— मला माझ्या वडील बंधूंसह एकत्र राहता येत होतं. कुणी सांगावं, हिंदुस्थानच्या कारागृहात त्यांना बहुधा निराळं ठेवण्यात येईल. आम्हा दोघांना भिन्न भिन्न प्रांतांत धाडण्यात येईल. शिवाय, गेल्या दहा वर्षांत अंदमानच्या

लोकांत आमचे अनेक मित्र झाले होते, त्यांचा विरहही आम्हांला होणार होता.

आम्ही पुस्तकांची बांधाबांध केली. त्यांतील बरीच पुस्तकं तिथल्या ग्रंथालयास दिली. पुष्कळशी तिथल्या बंदीवानांत व इतरांत वाटून दिली.

शेवटच्या दिवशी बाहेरची मंडळी या नाही त्या निमित्तानं सारखी भेटायला येऊन जात होती. आम्हांला प्रत्यक्ष भेटणं ज्यांना अशक्य होतं त्यांनीदेखील भेट म्हणून फुलं, फळं, मिठाई, बिस्किटांचे डबे कारागृहाच्या फाटकात पोचवण्याचा धडाका चालवला. काय जे पाचदहा रुपये महिन्याचे मिळतील त्यांत त्यांचा संसार: पण भक्ती केवढी! न पुसता, न विचारता आणि सरकारी निर्बंधास न जुमानता, एखादं केळं, एखादं कलिंगड, निदान एखादं फूल कारागृहाच्या दाराशी ठेवून जात.

दुपारी मी फाटकाशी गेलो आणि त्या जमलेल्या ढिगातील वस्तू तिथंच वाटून दिल्या. अगदीच कोणी ऐकेना तेव्हा काही आमच्यासाठी घेतल्या.

इतक्यात पहारेकऱ्यानं कळवलं, "साहेब आता है। आपको ले जानेवाली शिपाईओं की तुकडी भी आती है। "

आम्ही उठलो. मनात आलं — अंदमानच्या या कारागृहात आजवर आशेच्या थडग्यात पुरलेले राहिलो. कारागृहाचं दार आता दहा-बारा वर्षांनी पुन्हा उघडणार!

मला आणि माझ्या बंधूंना फाटकात उभं करण्यात आलं. बंदीपालानं आम्हांला हिंदुस्थानात नेण्यासाठी शिपायांच्या स्वाधीन केलं. मग अंदमानच्या त्या भयंकर कारागृहाचं दार उघडलं.

१९०९ साली ते असंच एकदा उघडलं आणि माझ्या बंधूंना गिळून बंद झालं! १९११ साली पुन्हा तो विक्राळ जबडा उघडला आणि मला गटकावून बंद झाला! त्या वेळी त्यातून पुन्हा जिवंतपणी बाहेर पडण्याची आशा कोणालाही वाटत नव्हती. १९११ साली बंद झालेलं कारागृहाचं ते दार आता १९२१ साली पुन्हा करकरलं! तो जबडा पुन्हा उघडला आणि आम्ही दोघेही बंधू जिवंतपणी आतून बाहेर पडलो.

लोकांनी आम्हांला निरोप देण्यासाठी कारागृहाबाहेर दाटी करू नये म्हणून

कडक बंदोबस्त ठेवण्यात आला होता. शिपायांच्या पहाऱ्यात आम्ही समुद्राकडं चालू लागतो न लागतो, तोच एक बंदी-अधिकारी पुढं झाला. शिपायांना न जुमानता त्यानं चाफ्याच्या फुलांची एक माळ माझ्या गळ्यात घातली. पहाऱ्याचे ते शिपाई आरडाओरड करू लागले, तोच माझ्या पायांवर डोकं ठेवून जयजयकार करत तो निघूनही गेला.

आम्ही समुद्राकडील चढण उतरू लागलो. दहा वर्षांपूर्वी हीच चढण चढून बंदीशाळेकडं जाताना मला वाटलं होतं, की या चढणीवरून उतरण्याचा प्रसंग पुन्हा या जन्मात येईल का ?

तोच जहाज आलं. आम्ही त्यावर चढलो. जहाजाच्या अगदी तळाशी बंदीवानांकरता असलेल्या पिंजऱ्यात आम्हांला नेण्यात आलं. दहा वर्षांपूर्वी येताना याच पिंजऱ्यात मला कोंबलं होतं. त्या आठवणीसरशी शहारे आले.

मी बॅरिस्टर होण्यासाठी १९०६ साली विलायतेला गेलो. त्यानंतर माझ्या वडील बंधूंची – बाबांची – आणि माझी निवांत अशी गाठ आता प्रथमच पडत होती.

गेल्या चौदा वर्षांतील सर्व गोष्टी बाबा मला रात्री सांगत. मी विलायतेस गेल्यानंतर हिंदुस्थानात 'अभिनव भारता'ची चळवळ कशी फोफावत गेली, आमचे कोणकोण सहकारी पकडले गेले, स्वत: बाबा कसे धरले गेले, त्यांच्याकडून बातमी काढण्यासाठी कारागृहात त्यांचा कसा अमानुष छळ झाला, तरीही एक ब्रसुद्धा त्यांच्या तोंडातून कसा निघाला नाही, शेवटी ते कसे मूर्च्छित पडले...हा सारा रोमांचकारी वृत्तान्त त्यांनी सांगितला. मी ऐकला.

अंदमानमध्ये राहिलेल्या जिवलग मित्रांच्या आठवणी येऊन आम्हांला फार हुरहूर वाटे. पुन्हा असंच्या असं अंदमानात जावं आणि त्यांना भेटावं, असं मनात येई.

चौथ्या का पाचव्या दिवशी वारा खाण्यासाठी आम्हांला जेव्हा डेकवर अर्धा तास नेण्यात आलं, तेव्हा समोर हिंदुस्थानचा तट दिसू लागला.

हिंदुस्थानचा तट! ज्या प्रिय मातृभूमीच्या केवळ स्मृतीनं आजवर अनेक यातना भोगल्या तिची ती प्रत्यक्ष मूर्ती! ते चरण पुन्हा दिसले! याच

आयुष्यात पुन्हा दिसले! मी वळून बाबांना म्हटलं, "बाबा, तो पहा भारत! निळा समुद्र नित्य धूत असलेले त्याचे ते चरणतल!"

आम्ही दोघेही भक्तिभावानं थरारून उठलो आणि मातृभूमीच्या त्या चरणांपुढं हात जोडून उद्गारलो, "स्वातंत्र्यलक्ष्मी की जय! वन्दे मातरम्!"



**शब्दार्थ व टिपा :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**गाढ** - मोठे; खोल. **तेलगोदाम** - तेल साठवण्याचे कोठार. **वॉर्डर** - तुरुंगातल्या इतर कैद्यांवर देखरेख करणारा व अन्य कामे पाहणारा दीर्घ मुदतीचा कैदी. **आशेच्या थडग्यात पुरलेले** - भविष्यकाळविषयीच्या सर्व आशा नष्ट झालेले. **तट** - किनारा, तीर. **चरणतल** - पायांचे तळवे.

**अंदमान** - भारताच्या आग्नेयेस सुमारे १२०० किलोमीटर अंतरावर बंगालच्या उपसागरात असलेला, लहान-मोठ्या बेटांनी बनलेला प्रदेश. भारतावर इंग्रजांचे राज्य होते, तेव्हा स्वातंत्र्यासाठी प्रयत्न करणाऱ्या अनेक देशभक्तांना या बेटांवरील तुरुंगात ठेवण्यात आले होते.

**अभिनव भारत** - इंग्रजांच्या गुलामगिरीतून शस्त्रांच्या मदतीने भारत स्वतंत्र करण्यासाठी सावरकरांनी १९०४ साली स्थापन केलेली क्रांतिकारकांची संस्था.

**वाक्प्रचार :**

**तोंडातून ब्रसुद्धा न निघणे** - काहीच न बोलणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. हिंदुस्थानात परत पाठवले जात असूनही सावरकरांना उदास का वाटू लागले ?

२. अंदमानच्या लोकांनी त्यांच्यावरील आपले प्रेम कसे दाखवले ?

३. बाबांनी सावरकरांना कोणकोणत्या गोष्टी सांगितल्या ?

४. बोटीच्या डेकवरून हिंदुस्थानचा तट दिसू लागला याचा सावरकरबंधूंवर काय परिणाम झाला ?

५. **व्याकरण :**

खालील वाक्ये वाचा.

(१) बातमी चांगली **आहे.** (२) खंड्या आम्हा मुलांपैकीच एक **होता.** (३) या विहिरीला पायऱ्या **नाहीत.** (४) आसपास कोणीही **नव्हते.** (५) समुद्रकिनाऱ्यावर वाळू **असते.**

वरील वाक्यांत 'आहे', 'होता', 'नाहीत', 'नव्हते', 'असते' ही क्रियापदे आहेत.

(क) पुढील वाक्यांत रिकाम्या जागी योग्य क्रियापदे लिहा.

(अ) मी आलो पण त्या वेळी तू घरी........ (आ) गंगा ही भारताची सर्वांत मोठी नदी........ (इ) ती नंतर जेवेल. आता तिला मुळीच भूक........ (ई) सामना जिंकला की आपल्याला फार आनंद........

(ख) पुढील क्रियापदांचा उपयोग करून वाक्ये तयार करा.

वाहतो, नाहीत, हसलो, गेलास, असतील.

६. (अ) 'लोकांनी आमच्यावर अभिनंदनाचा पाऊस पाडण्यास आरंभ केला.' पाऊस जसा अनेक धारांनी एकसारखा कोसळतो, तसे लोकांकडून आमचे अनेक प्रकारांनी एकसारखे अभिनंदन होऊ लागले, असा वरील वाक्याचा अर्थ आहे. 'पाऊस पडणे' या शब्दांचा खालीलपैकी प्रत्येक शब्दाबरोबर उपयोग करून वाक्ये तयार करा.

पत्रे, देणग्या, पैसा.

(आ) **'स्वातंत्र्यलक्ष्मी की जय!', 'वन्दे मातरम्!' या स्फूर्ती देणाऱ्या घोषणा आहेत. यांसारख्या आणखी काही घोषणा व त्या कोणी दिल्या ही माहिती मिळवून त्यांच्या जोड्या लावा. जसे –**

| | |
|---|---|
| स्वातंत्र्यलक्ष्मी की जय! | स्वातंत्र्यवीर सावरकर |
| वन्दे मातरम्! | बंकिमचंद्र चतर्जी |

---

# १७. भाऊबीज

उद्याचीच भाऊबीज
कोण मला ओवाळील ?
कोण ओवाळणीसाठी
मजसवे झगडील ?

इथे आज पडलो मी
माझ्या गावाहून दूर,
'कुणा घालू ओवाळणी ?'
लागे मला हुरहूर.

इथे साऱ्याच बहिणी
परक्या या नगरात,
परी असे निराळीच
माझ्या बहिणीची प्रीत.

कसे बहिणीचे नाते!
कशी बहिणीची माया!
ओवाळणी मागतसे
सालभर भांडुनीया!

उद्याचीच भाऊबीज
महोत्सव घरोघरी,
आणि पाहीन हे सारे
एकटाच वेड्यापरी!



**शब्दार्थ व टिपा :** ******************************

**हुरहूर** – चिंता; काळजीने येणारी अस्वस्थता. **प्रीत** – प्रेम; माया. **महोत्सव** – मोठा सोहळा, उत्सव.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. कवीला हुरहूर का वाटली ?
२. भाऊबिजेला आपली बहीण जवळ नाही, हे कोणकोणत्या ओळींतून दिसून येते ?
३. भावाबहिणीच्या प्रेमळपणाचा तुम्ही अनुभवलेला प्रसंग तुमच्या शब्दांत सांगा.
४. बहीणभावाच्या प्रेमाची काही लोकगीते किंवा ओव्या मिळवा, आणि तुमच्या वहीत लिहून ठेवा.



# १८. पंडित नेहरू : एक पुरुषोत्तम

भारताला स्वातंत्र्य मिळवण्यासाठी झटणाऱ्या नेत्यांत पंडित जवाहरलाल नेहरू हे एक प्रमुख नेते होते. स्वातंत्र्यासाठी झालेल्या अनेक चळवळींत इंग्रज सरकारने त्यांना वेळोवेळी तुरुंगात टाकले.

पंडितजी एकदा अहमदनगरच्या तुरुंगात होते. त्या वेळची गोष्ट. त्या वेळी त्यांच्या कुटुंबातील बहुतेक सर्व जवळची मंडळीही या ना त्या तुरुंगात गेली होती. त्यामुळे त्यांच्या घराची सर्व जबाबदारी तिथल्या नोकरमाणसांवरच पडली होती.

नेहरूंचे अलाहाबादमधले हे घर म्हणजे 'आनंदभवन'. ते अतिशय भव्य व सुंदर होते. तिथे येणाऱ्या-जाणाऱ्यांचा सारखा राबता असे. त्यांची सगळी ऊठबस त्या नोकरमाणसांनी उत्तम रीतीने सांभाळली. मालकांची उणीव कुणाला भासू दिली नाही. त्याबद्दल जवाहरलालजींना त्या नोकरांचे फार कौतुक वाटे. तुरुंगातून आपल्या बहिणीला पाठवलेल्या पत्रात त्यांनी लिहिले — 'घरातल्या सर्व नोकरांचे पगार वाढवून त्यांच्या कामाचं चीज केलं पाहिजे.'

खेळकर स्वभावाची माणसे राजकारणात उतरली, की पुष्कळदा तीसुद्धा गंभीर व रुक्ष बनतात; पण राजकारणाच्या धकाधकीत वावरत असूनही पंडितजींचा खेळकरपणा आणि त्यांची रसिकता कधी नाहीशी झाली नाही.

एकदा दिल्लीत राष्ट्रीय नाट्यमहोत्सव साजरा झाला. त्याचे उद्‌घाटन पंतप्रधान नेहरूंनी केले. उद्‌घाटनानंतर लगेच 'शाकुंतल' नाटकाचा प्रयोग होणार होता. पंडितजींना फारसा वेळ नसल्यामुळे फक्त पहिला अंक पाहून ते परत जाणार होते.

त्याप्रमाणे पहिला अंक झाल्यावर संयोजकांनी तसे जाहीरही केले आणि सांगितले,की  पंडितजींच्या हातून आधी कलाकारांना बक्षिसं दिली जातील आणि मग नाटक पुढं सुरू होईल.

पंडितजी तर ते नाटक पाहण्यात अतिशय रंगून गेले होते. आपल्या आसनावरून ते मोठ्याने म्हणाले, "अहो, मला संपूर्ण नाटक बघायचं आहे. तुम्ही मला आधीच बाहेर घालवून देणार की काय ?"

हे उद्‌गार ऐकताच प्रेक्षकांत हशा उसळला आणि थोड्याच वेळात नाटकाचा दुसरा अंक पंडितजींच्या उपस्थितीत सुरू झाला.

पंडितजी असे मोठे रसिक होते. स्वच्छता व टापटीप यांचेही ते मोठे भोक्ते होते. कुठेही अव्यवस्था, गबाळेपणा, अस्वच्छता दिसली, की त्यांचा पारा चढे. अशा वेळी ते स्वतः उठत आणि कामाला लागत.

एकदा पंडितजी नागपूरच्या दौऱ्यावर गेले होते. तिथे टोलेजंग सभांतून हजारो लोकांनी त्यांची भाषणे ऐकली. नागपूर शहर त्यांच्या जयजयकाराने दुमदुमून गेले.

एका सायंकाळी पंडितजींच्याबरोबर उपाहाराचा कार्यक्रम नागपुरातील एका उद्यानात ठेवण्यात आला. उद्यान उत्तम प्रकारे सजवण्यात आले होते. विजेची रोशणाई झगमगत होती. मऊ सुंदर हिरवळीवर गादीच्या खुर्च्या शोभून दिसत होत्या. टेबलाटेबलांवरील फुलदाण्यांत अनेक रंगांच्या फुलांचे सुगंधी गुच्छ ठेवले होते. विविध प्रकारची मिठाई, रुचिदार पदार्थ आणि खास नागपुरी संत्री यांची टेबलांवर रेलचेल होती.

पंडितजी येऊन दाखल झाले. उपाहारास आरंभ झाला. उपस्थित असलेले प्रमुख नेते, प्रतिष्ठित नागरिक, मंत्री, वरिष्ठ अधिकारी यांच्यापैकी अनेकांनी संत्री सोलून साली तिथेच हिरवळीवर टाकल्या. पंडितजींना ते

मुळीच आवडले नाही. ते झटकन खुर्चीवरून उठले आणि त्या साली गोळा करू लागले. ते पाहताच सारेजण ओशाळले. लगबगीने पुढे होऊन तेही हिरवळ स्वच्छ करू लागले.

जवाहरलालजींच्या पत्नी कमला. त्यांची प्रकृती मूळचीच नाजूक. पंडितजींच्या एका तुरुंगवासाच्या काळात त्यांची प्रकृती खूप ढासळली. पत्नीच्या या गंभीर दुखण्याची वार्ता समजून जवाहरलालजींचा जीव व्याकूळ होई. कमलादेवींची प्रकृती पुढे जास्तच खालावली. म्हणून इंग्रज सरकारने जवाहरलालजींना काही दिवसांसाठी तुरुंगातून घरी पाठवले.

त्या वेळी सरकारने त्यांना एक गोष्ट सुचवली होती – यापुढे राजकारणात भाग न घेण्याचे आश्वासन त्यांनी दिले, तर त्यांना पुन्हा तुरुंगात परत यावे लागणार नाही. देशाच्या स्वातंत्र्यासाठी राजकारण,की आजारी पत्नीबद्दलचे आपले कर्तव्य–असा पेच जवाहरलालजींना पडला.

अशा परिस्थितीत तुरुंगात परत जाण्याचा त्यांचा ठरलेला दिवस आला. अंथरुणावर खिळलेल्या कमलादेवींनी त्यांना खुणावून जवळ बोलावले. खोल गेलेल्या आवाजात त्या म्हणाल्या, "सरकारला आश्वासन देण्याविषयी बोलणी चालली आहेत, हे खरं का ? मी सांगते – तसलं काही आश्वासन देऊ नका."

जवाहरलालजींपुढील पेच त्यांच्या वीरपत्नीने अशा रीतीने सोडवला. आपली पत्नी किती थोर आहे, हे जवाहरलालजी जाणून होते. म्हणूनतर आपले आत्मचरित्र त्यांनी आपल्या पत्नीलाच अर्पण केले आहे.

अनेक उत्तम गुण अंगी असलेल्या पुरुषास 'पुरुषोत्तम' म्हणतात. आपल्या भारताचे पहिले पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू सर्वार्थांनी एक पुरुषोत्तम होते.

**शब्दार्थ व टिपा :** ****************************

**राबता** – येणाऱ्या-जाणाऱ्यांची वर्दळ. **रूक्ष** – कसलीही कोमल भावना नसलेला, कोरडा. **धकाधकी** – दगदगीचे किंवा धावपळीचे जीवन. **रसिकता** – चांगल्या व सुंदर

गोष्टींनील मर्म समजून घेऊन आनंद घेण्याची वृत्ती. **भोक्ता** - कलादी गुणांचा चाहना, आवड असणारा. **उपाहार** - फराळ. **रेलचेल** - विपुलता. **प्रतिष्ठित** - समाजात मान प्राप्त झालेला. **ओशाळणे** - शरमणे.

**वाक्प्रचार :**

**पारा चढणे** - राग येणे. **चीज करणे** - एखादयाने केलेल्या कामाचे योग्य ते बक्षीस देणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. नोकरांचे पगार वाढवावे असे जवाहरलालजींनी कोणाला व का लिहिले ?

२. राजकारणाच्या धकाधकीत असूनही नेहरूंचे वेगळेपण कशात होते ?

३. उपाहारासाठी आलेल्यांना नेहरूंनी स्वत:च्या कृतीने कोणता धडा शिकवला ?

४. जवाहरलालजींसमोर कोणता पेच होता ? तो कोणी व कसा सोडवला ?

५. जवाहरलालजींना 'पुरुषोत्तम' असे का म्हटले आहे ?

६. (अ) 'कला' या शब्दास 'कार' (करणारा) हा शब्द जोडला जाऊन 'कलाकार' हा शब्द तयार झाला आहे. खालील शब्दांस 'कार' हा शब्द जोडून अशा प्रकारचे शब्द तयार करा.
नाटक, चित्र, मूर्ती, शिल्प, कथा, संगीत.

(आ) 'चीज करणे', 'पारा चढणे', 'जीव व्याकूळ होणे' या वाक्प्रचारांचा उपयोग करून वाक्ये तयार करा आणि ती लिहा.

७. **व्याकरण :**

(क) या पाठाच्या तिसऱ्या परिच्छेदातील नामे व विशेषणे शोधा आणि ती तुमच्या वहीत खालीलप्रमाणे दोन गटांत लिहा.
१. नाम        २. विशेषण

(ख) पुढील वाक्यांतील सर्वनामे व क्रियापदे ओळखा.
(अ) स्वच्छतेचे ते मोठे भोक्ते होते.
(आ) कमलादेवींनी त्यांना बोलावले.
(इ) मी काही दिवस मुंबईला राहीन.
(ई) जो गुणी असतो, तो सर्वांना आवडतो.
(उ) ती फार अशक्त दिसते.
(ऊ) जत्रेतून बाबांनी तुला काय आणले ?
(ए) आता त्यांना मुळीच धास्ती नव्हती.

८. जवाहरलाल नेहरूंच्या आणखी काही आठवणी मिळवा आणि त्या नेहरू-जयंतीच्या दिवशी बालसभेत सांगा.

# १९. शिकाऱ्यातून जलविहार

श्रीनगर शहर जेहलम नदीच्या दोन्ही तीरांवर वसलेलं आहे. शहराच्या कित्येक भागांत नदीचे कालवे आलेले आहेत. त्यामुळं पुष्कळशी रहदारी व मालाची वाहतूक जलमार्गानंच होते.

नदीच्या मुख्य पात्रात ये-जा करणाऱ्या बोटींचे तीन प्रकार आहेत. जिच्यात मन मानेल तितके दिवस मुक्काम करून राहण्याची सोय असते तिला 'हाउस-बोट' म्हणतात. केवळ सामानाची वाहतूक करणारे पडावही असतात. तो झाला दुसरा प्रकार. टांग्याप्रमाणंच तात्पुरत्या प्रवासासाठी वापरल्या जाणाऱ्या बोटींच्या तिसऱ्या प्रकाराला 'शिकारा' म्हणतात.

हे शिकारे सुंदर शृंगारलेले असतात. टांग्याच्या टपासारखं त्यांना सुंदर छत असतं. बसायला गादया-गिरदया असतात. त्यांत दोन माणसं अगदी ऐसपैस बसू शकतात. दाटीनं बसायचं असेल तर किती माणसांनी बसावं तो ज्याच्या त्याच्या मर्जीचा प्रश्न.

शिकारा वल्हवणारे दोन इसम असतात. ते आळीपाळीनं काम करतात. एक वल्हं मारतो आणि दुसरा एक लांब बांबू पाण्यात तळापर्यंत घालून जरूर तेव्हा शिकाऱ्याला दिशा देत असतो. बहुधा शिकाऱ्याचा मालक आणि त्याचा लहान छोकरा अगर छोकरी अशी ही जोडी असते. शिकारा हे इथलं अत्यंत लोकप्रिय, आरामशीर व जलद वाहन आहे.

मला जो शिकारा मिळाला त्याच्या मालकाचं नाव आहादू. कालव्याच्या काठावर मी सकाळी सात वाजता यायचं आणि आहादूनं आपला शिकारा घेऊन त्या ठिकाणी हजर राहायचं, असं आमचं ठरलं होतं. त्याप्रमाणं अगदी वेळेवर तो हजर राहिला.

मी शिकाऱ्यात बसलो आणि शिकारा निघाला. हा कालवा अखेर 'दल' सरोवरात शिरतो. पुष्कळ वेळ मी कालव्यातूनच चाललो होतो. ताज्या टवटवीत भाज्यांनी शिगोशीग भरलेले शेतकऱ्यांचे छोटे-मोठे पडाव अंगावरून जात होते. त्या भाज्या खेड्यांतून शहराकडं विकण्यासाठी जात

होत्या. उन्हं पुरती पडली नव्हती. सकाळच्या या पहिल्या प्रहरी पाण्यावर वाफेचा जो थर असतो तो जिकडं-तिकडं दिसत होता. त्यातून बाणाप्रमाणं आरपार गेलेली किरणं मोठी प्रेक्षणीय वाटत होती.

आता आमचा शिकारा शहराची सीमा ओलांडून पुढं आला होता. कालव्याच्या दोन्ही बाजूंस घरांऐवजी छोटे-मोठे मळे दिसत होते. आहादूनं मला सांगितलं, की ज्या जमिनीत हे मळे आहेत त्या जमिनी पाण्यात तरंगणाऱ्या असतात. आणि त्या घट्ट बांधून एके ठिकाणी स्थिर करून ठेवाव्या लागतात. एकाची गुरं दुसऱ्यानं ओढून न्यावी त्याप्रमाणं काही भाजीवाले एकमेकांच्या बांधलेल्या जमिनी रातोरात सोडून लांबवतात. त्यामुळं या मळ्यांच्या जमिनींवर सक्त पहारा ठेवावा लागतो. अगदी तयार झालेल्या कांद्याबटाट्यांसकट किंवा फुलाफळांसकट जमीन कोणीतरी चोरून नेली, की संपलंच सगळं! हे मला फार गमतीदार वाटलं आणि दोन्ही बाजूंच्या त्या मळ्यांकडं मी कौतुकानं अगदी निरखून पाहू लागलो.

कुटुंबातील मुख्य कर्ते पुरुष पडावांत भाजी भरून शहराकडं गेले होते आणि बायकामुलं वाफ्यांत काम करत होती. मुलांच्या अंगांवर धड कपडे नव्हते; पण किती सुंदर आणि गोजिरवाणी होती ती सारी!



आमचा शिकारा जेव्हा कालव्यातून बाहेर पडून पाण्याच्या विस्तीर्ण डोहात शिरल्याचं मला दिसलं, तेव्हा वल्ही मारण्यात गुंतलेल्या आहादूला मी विचारलं, "आता आपण 'दल'मध्ये येऊन दाखल झालो, नव्हे ?"

तो म्हणाला, "होय हुजूर. पण हा 'छोटा दल' आहे. थोड्या वेळानं आपण 'बडा दल'मध्ये जाऊ."

मी आजूबाजूस पाहू लागलो, तो त्या छोट्या समजल्या जाणाऱ्या सरोवराचाच विस्तार केवढातरी मला वाटला! जिकडेतिकडं पाणीच पाणी दिसत होतं. दूर अंतरावरच्या किनाऱ्यावर मोठमोठी झाडं दिसत होती. उजव्या बाजूस आणि समोर बर्फानं आच्छादलेली हिमालयाची शिखरं दिसत होती. सूर्यप्रकाशानं आता साऱ्या दिशा चांगल्याच उजळल्या होत्या. सरोवराच्या काळ्याभोर पाण्यात पर्वतांची प्रतिबिंबं स्पष्ट दिसत होती. सरोवरात ठिकठिकाणी वेताच्या झाडांचे गुच्छच्या गुच्छ अर्धे अंग पाण्यावर काढून उभे राहिलेले होते. त्यांच्या फांद्यांवरची लांबट, मऊ, हिरव्या रंगाची नवी पालवी वाऱ्यावर सळसळत होती.

आता आमचा शिकारा संथ पाण्यावरून खूपच वेगानं निघाला होता. 'बडा दल'मध्ये आम्ही दाखल झालो.

आहादूशी गप्पा मारता मारता मी सभोवारच्या रमणीय दृश्याकडं पाहतच होतो. माझ्या लक्षात आलं, की बड्या दलचा विस्तार ओलांडून शिकारा आता पुन्हा एखादया मोठ्या कालव्याप्रमाणं दिसणाऱ्या प्रवाहातून जात होता. पाहतो तो कितीतरी शिकारे 'शालिमार' बागेकडं चाललेले दिसून आले. कुठून आणि केव्हा आले ते मला कळलंही नाही. आपल्या नकळत पक्ष्यांचा थवा गोळा झालेला दिसावा,तसे शिकारे प्रकट झाल्यासारखे मला वाटले.

शिकाऱ्यांप्रमाणंच काही हाउस-बोटीही बागेकडं चालल्या होत्या. काही बोटींतून कुटुंबवत्सल माणसं आपल्या बायकामुलांना घेऊन निघाली होती. कित्येक बोटींत फोनोग्राफ लागले होते. प्रत्येक बोटीत मागच्या आडोशाच्या बाजूस शेगड्या पेटल्या होत्या आणि खाना तयार होत होता.

लवकरच आम्ही 'शालिमार' बागेला येऊन पोचलो. बागेचा एकेक



मजला चढून जसजसं वर जाऊ लागलो तसतसं अत्यंत भव्य आणि रमणीय उद्यान मला दिसू लागलं.

या उद्यानात चिनार वृक्षांच्या रांगाच्या रांगा उभ्या आहेत. त्या रांगांमधून विविध आकृतींचे हिरवेगार वाफे असून त्यांत अगणित रंगांची फुलझाडं आहेत. चिनार वृक्षांचा प्रचंडपणा, त्यांची गर्द छाया, त्यांच्या पानांचा नाजूकपणा व तेज या गोष्टींची कल्पना केवळ वर्णनानं येणं शक्य नाही.

बागेच्या मधोमध प्रत्येक मजल्यावर एकेक मोठी पुष्करिणी आहे. चारही मजल्यांवरच्या चारही पुष्करिण्या एका पाटानं जोडल्या आहेत आणि या पाटात कारंज्यांची रांगच्या रांग लावलेली आहे. श्रीनगरच्या उत्तरेस एक मोठा तलाव आहे. त्यातलं पाणी आणून या जागेत खेळवलं आहे. वरच्या पुष्करिणीतून खालच्या पुष्करिणीत अशा प्रकारे पाणी पडत असतं आणि अखेर 'दल'सरोवरात जात असतं.

चौथ्या मजल्यावर विस्तीर्ण असा चबुतरा असून त्यावर दगडी मंडप आहे. मंडपाचे खांब काळ्याभोर रंगाचे आहेत. त्यांवर सुबक नक्षीकाम केलेलं आहे. या मंडपात मी येऊन उभा राहिलो आणि प्रवेशद्वाराकडं तोंड करून त्या भव्य उद्यानाचं सौंदर्य बघत राहिलो.

**शब्दार्थ व टिपा :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**शृंगारलेले** – सजवलेले, सुशोभित केलेले. **शिगोशीग** – काठोकाठ. **प्रहर** – दिवसाचा आठवा भाग – तीन तास. **सक्त** – कडक, कठोर, **विस्तीर्ण** – लांबवर पसरलेला. **कुटुंबवत्सल** – आपल्या बायकोमुलांवर माया करणारा. **पुष्करिणी** – लहान बांधीव तळे, जलाशय. **चबुतरा** – चौकोनी ओटा, चौथरा.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. शिकाऱ्याचे वर्णन तीनचार वाक्यात करा.

२. सकाळच्या पहिल्या प्रहरी लेखकाला कोणते दृश्य दिसले ?

३. लेखकाने पाहिलेल्या मळ्यांचे वेगळेपण कशात आहे ?

४. 'छोटा दल' या सरोवरात लेखकाला काय काय दिसले ?

५. लेखकाला चार मजले कोठे दिसून आले ? तेथे त्याने कोणकोणत्या गोष्टी पाहिल्या ?

६. 'गुच्छच्या गुच्छ' म्हणजे अनेक गुच्छ. खालील शब्दांपासून यासारखे शब्द तयार करून त्यांचा वाक्यात उपयोग करा.

थवा, रांग, ताटवा, कळप, तांडा, झुपका.

७. **व्याकरण :**

मराठीत तीन लिंगे आहेत – पुल्लिंग, स्त्रीलिंग व नपुसकलिंग.
मुलगा, बैल, कोंबडा, पर्वत, फळा ही नामे पुल्लिंगी आहेत.
मुलगी, गाय, कोंबडी, नदी, शाळा ही नामे स्त्रीलिंगी आहेत.
मूल, वासरू, शहर, फळ, पुस्तक ही नामे नपुसकलिंगी आहेत.

(क) खालील वाक्यांतील नामे व त्यांची लिंगे ओळखा.

(अ) किनाऱ्यावर मोठमोठी झाडे दिसत होती.
(आ) बायका व मुले वाफ्यात काम करतात.
(इ) सूर्याच्या प्रकाशाने दिशा उजळल्या होत्या.
(ई) पांडुतात्यांना फार झोप येत असे.

(ख) (अ) पुढील नामांची स्त्रीलिंगी रूपे लिहा.
गवळी, काका, वाघ, मोर, सासरा.

(आ) पुढील नामांची पुल्लिंगी रूपे लिहा.
म्हैस, बहीण, मैत्रीण, देवी, राणी.

८. शक्य असेल तर नावेतून जलप्रवासाचा आनंद लुटण्यासाठी सहल काढा.

---

# २०. घाम हवा घाम

म्होरक्या : (ढोलके बडवून) ऐका हो ऐका. पैशाला दोन खारका. आम्ही बंबपूरचे राहणार. सुप्रसिद्ध गोष्टी सांगणार. ऐकून डोक्याला केस फुटतील. केसांत डोकी पिकतील. पिकात बैल घुसतील आणि बैलांवर कावळे बसतील. कावळ्यांनी घेतला झोका आणि आता आमची गोष्ट ऐका!
(ढोलके बडवतो. राजा आणि राणी आतून नाचत येतात. दोघांच्या पायांत चाळ. मागून सेवक. तेही नाचतच येतात.) आपण कोण ?

राजा : (नाचत) आम्ही द्रोण.

म्होरक्या : दह्याचे द्रोण की तुपाचे द्रोण ?

राजा : महाराजाधिराज द्रोण!

म्होरक्या : या कोण ?

राणी : (नाचत) आम्ही पत्रावळ.

म्होरक्या : (ढोलके बडवून) हे द्रोण आणि या पत्रावळ. या राज्याचे राजे-राणी. वाड्यात त्यांच्या पैशाच्या गोणी. रोज खातात लोणी आणि गातात गाणी. अहो, पत्रावळबाई...

राणी : आम्हांला आहे घाई. दूर व्हा बाई. आम्ही चाललो कामाला.

म्होरक्या : कामाला ? कसलं काम ?

राणी : मिळाला तर बघायचा आहे कुठं मिळतो का थोडा घाम.

म्होरक्या : घाम ? घाम तर अंगावर फुटतो. कष्ट करून तो सुटतो.

राजा : (किंचाळत) कष्ट! कष्ट करायला सांगून कोण करतो आहे आमचा अपमान, दुष्ट ? आम्ही राजे! महाराजाधिराज द्रोण!

राणी : (नाचत) आम्ही राणी! महाराणी पत्रावळ! घाम, मिळेल का कुठं थोडा घाम ?

राजा : (नाचत)घाम... घाम...

सेवक : घाम... घाम... घाम...

(सगळे नाचत आत जातात.)

म्होरक्या : (ढोलक्यावर थाप मारून) राजे-राणी निघाली घाम शोधायला, घाम शोधायला...

(एक भटजी येतो.)

भटजी : घाम ? काय घाम ?

म्होरक्या : राजाधिराज द्रोण आणि महाराणी पत्रावळ यांना हवा होता घाम. ती काय शोधत गेली... लांब... लांब...

(राजवैद्य ढोलकीच्या कडकडाटात स्टेजवर येऊन उताणा पडतो. भटजी राजवैद्याला बकोट पकडून उठवतो.)

राजवैद्य : सुखकर्ता, दुःखहर्ता वार्ता विघ्नाची – कुठून आली वार्ता विघ्नाची ? – आगीची, व्याधीची, रोगाची, राईची, दुखण्याची, खुपण्याची... कुठून आली ? कुठून ? इकडून ? की इकडून ?

म्होरक्या : आपण वैद्य ?



राजवैद्य : हां, हां. साधे वैद्य नाही; आम्ही राजवैद्य!

म्होरक्या : (ढोलके बडवून) हे राजाचे वैद्य – राजवैद्य – वैद्यराज – वैद्यांचे राजे.

राजवैद्य : बघू, 'आ' करा 'आ' ... कोणता दुखतो ? डावा की उजवा ?

म्होरक्या : आम्ही निरोगी! राजाराणीला घाम हवा.

राजवैद्य : घाम ?

दोघे : घाम.

राजवैद्य : हवा ?

दोघे : हवा.

राजवैद्य : (दोघांना तालात म्हणत जवळ बोलावून) असं या. इथं या. इकडं या. जवळ या.

दोघे : असं या, तसं या. आलो जवळ. काय करता पाहू या.

राजवैद्य : (मान लांब उंच करत, इकडेतिकडे टेहळणी करत...) तिकडं कोण ? इकडं कोण ? ते काय ? हे काय ? हां, आता कुणी ऐकत नाही. शपथ घ्या. म्हणा — नाही, कुणाला सांगणार नाही.

दोघे : शपथ, शपथ, शपथ!

राजवैद्य : राजाराणी वैभवात; पण सुख नाही नशिबात. आहे सगळा ऐषआराम; पण काय सांगू ? नशिबात नाही आराम आणि कशात नाही राम!

म्होरक्या : (ढोलके बडवून) ऐका हो, ऐका – राजाराणीला सुख नाही. सुख नाही. सुख नाही. सुख नाही.

राजवैद्य : सुख नाही म्हणून दिली आहे मात्रा. मात्र घ्यायचे वळसे सतरा. आहे रामबाण. अस्सल वाण. गुणवान. गुणवान माणसाचाच घाम — कष्टाचा घाम, निढळाचा घाम, श्रमाचा घाम.

तिघे : (ढोलकीच्या तालावर नाचत) घाम करी काम, राजा करी सलाम! माणसाचा घाम, कष्टाचा घाम, निढळाचा घाम, श्रमाचा घाम. (ढोलकीच्या तालावर नाचत नाचत आत जातात.)

राजाराणी : (एकदम थयथय नाचत) घाम, घाम, घाम, घाम. घाम, घाम, घाम, घाम.

(फक्त भटजी उरतो. एक शेतकरी आपल्या दोन बैलांना हाकत येतो. हे बैल म्हणजे बैलाच्या झुलीमधली मुलेच आहेत.)

भटजी : (बैलांना) आपण कोण ?

पहिला बैल : आम्ही गणपतराव.

भटजी : आपण ?

दुसरा बैल : आम्ही शिरपतराव.

भटजी : काय काढलं इकडं काम ?

शेतकरी : काम ? कोण करतोय काम ? आमी चाललो बाजारला. बा आमचा आजारला. डाक्टरचा भाव वधारला. पैशासाठी चाललो बाजारला.

भटजी : बाजारात जाऊन काय करणार ?

शेतकरी : यांतला एक बैल विकणार .

भटजी : मग शेत कोण नांगरणार ?

शेतकरी : थोडं शेत विकू ऽऽ

भटजी : मग नांगर काय करणार ?

शेतकरी : नांगर विकूऽऽ

भटजी : नांगर विकून काय खाणार ?

शेतकरी : घर विकूऽऽ

भटजी : घर विकून कुठं राहणार ?

शेतकरी : आणि थोडं शेत विकू ऽऽ

भटजी : पण शेतात कोण राबतं ?

शेतकरी : मानसं. आपून लावतो कामाला. ती कामं करत्यात. आम्ही बसून खातोय.

भटजी : या माणसांना घाम येत असेल, नव्हे रे ?

शेतकरी : तर! कष्ट करतो त्याला घाम येतोच!

भटजी : मग आधी सांग, ही माणसं भेटतात तरी कुठं ?

शेतकरी : शेतात न्हवं ? पर मानसं गेली पळून. शेत जाळून. आमी त्यान्ला पैसे दिले नाहीत म्हणून. नवी मानसं मिळत नाहीत. शेत काही पिकत नाही. बा आमचा आजारला. डाक्टरचा भाव वधारला. पैका हवा म्हणून चाललो बाजारला. चला गणपतराव, चला शिरपतराव. हो – हो – हो-- हाइक् —

(शेतकरी बैलांसह जातो. मागोमाग भटजीही जातो... डोके खाजवीत. ढोलकीवाला साथीदारांसह घोषणा देत प्रवेश करतो. बरोबर वैद्य. तेवढ्यात संपवाला प्रवेश करतो. झिंदाबादच्या घोषणा – कष्टाचा विजय असो! घामाचा विजय असो! )

राजवैद्य : (पुढे होऊन) अरे हो, हो, हो – हळू ओरडा. नाही तर जग पाडाल. आपण कोण ? आम्हांला कळेल काय ?

कामगार : आम्ही ? आम्ही संपतराव संपवाले!

म्होरक्या : (ढोलकीवर थाप मारून) भले, भले ! संपतराव संपाजी संपवाले, भले भले! हे संपत संपाजी संपवाले.

म्होरक्या-साथीदार : राजाराणीला हो घाम मिळाला, राजाराणीला हो घाम भेटला!

राजा : (हे सर्व 'हो हो' करून थांबवून कामगाराकडे पाहत) कोण आहे तिकडे ? याला अटक करा.

(साथीदार येऊन कामगाराला धरतात.)

राजा : (नाटकातल्या राक्षसाच्या पद्धतीने हे थांबवून, अंगात आल्यासारखा) संपवाल्या, मुकाट्यानं घाम दाखव कुठं मिळतो. घाम दाखव, नाही तर मरायला सिद्ध हो! घाम दिल्याशिवाय तुझी धडगत नाही. उगारा रे तलवारी!

(साथीदार तलवारी उगारून उभे.)

राजा : (विकट हसून) कुठं आहे घाम ? घाम! घाम!!

कामगार : (थरथर कापत) द – द – दक्षिणेकडं महाराज...

राजा : चला तर दक्षिणेकडं.

(वरातीप्रमाणे सगळे गोल गोल फिरून एका जागी थांबतात.)

म्होरक्या : (ढोलकीवर थाप मारून) दक्षिण आ ऽ ली.

राजा : कुठं आहे घाम ?

म्होरक्या : (पुन्हा थाप मारून) सरोवर आ ऽ ऽ लं.

राजा : हाच घाम काय ?

राजवैद्य : नाही महाराज, हे सरोवर. पृथ्वीच्या अंगावर असतं ते सरोवर आणि माणसाच्या अंगावर असतो तो घाम!

राजा : (ओरडत) मग घाम कुठं आहे ?

कामगार : उ - उ - उत्तरेकडं.

राजा : चला तर मग उत्तरेकडं.

(राजाराणी व सेवक आत जातात.)

म्होरक्या : पूर्वा झाली, दक्षिणा झाली, अहो आग्नेया झाली, ईशान्या झाली (ढोलकीवर थाप मारून) उत्तरा आ ऽ ली!

साथीदार : आली ?

म्होरक्या : गावं आ ऽ ली.

साथीदार : आली ?

म्होरक्या : काम कोणी करीनाऽऽऽ

साथीदार : करीनाऽऽऽ

म्होरक्या : घाम काही गळेनाऽऽऽ.

साथीदार : गळेनाऽऽऽ.

म्होरक्या : (तालासुरात)

राज्यात कोणी कष्ट करीना हो कोणी काम करीना
शेतं पिकंनात । गुरं जगंनात
घरं भरंनात । दारं खुलंनात
कारखानं, दुकानं, मकानं चालंनात.
आणि मग काम कोण करतं ?

सगळे : (प्रत्येकाला मागे घाईने विचारतात.) कोण करतं ? कोण करतं ?

म्होरक्या : घाम कोण गाळतं ?

सगळे : (पुन्हा तसेच मागे उलट विचारतात) कोण गाळतं ? कोण गाळतं ?

राजा : (येतो) शेतं कोण नांगरतं ? कारखानं कोण चालवतं ? दुकानं, मकानं कोण चालवतं ?

सगळे : (ओळीत उभे. क्रमाने एकेकजण मागे बोट दाखवतो.) मागं विचारा, मागं विचारा, मागं विचारा.

(राजावर पाळी येते.)

राजा : (संतापाने) अरे, मागं काय विचारा ?

सगळे (उलट) पुढं विचारा, पुढं विचारा, पुढं विचारा.

(पुन्हा राजावर पाळी येते.)

राजा : हे कोण ?

म्होरक्या : आपलीच प्रजा महाराज द्रोण!

राजा : (वैतागलेला) या राज्यात काम कोणीच करेनात!

साथीदार : काम कोणी करंनाऽऽऽ

राजा : म्हणून घाम गळेना.

म्होरक्या : (तालात) काम कोणी करंना. घाम काही गळंना.

राजा : फाशीचा खांब रोवा.

(सेवक तालामध्ये फाशीचा खांब आणून उभा करतात.)

राणी : (धक्का बसून) महाराज!

सेवक: (अस्पष्ट) महाराज!

राजा : हे आमच्या प्रजाजनांनो! आमचा निश्चय बदलणार नाही! या राज्यामध्ये घाम गळत नाही; कारण कुणी कष्ट करत नाही. कुणी कष्ट करत नाही म्हणून राज्य रसातळाला चाललं. सारे आयतोबा झाले. या राज्याला कसली आशा उरली नाही. आम्ही हे पाहिलं. पूर्वेला, पश्चिमेला, दक्षिणेला आणि उत्तरेला पाहिलं. आणि आम्ही ठरवलं, की ज्या कुणामुळं हा घोर अपराध घडला आहे त्याला फाशीच दिलं पाहिजे!

सर्वजण : महाराज!

राजा : होय! ही चूक काही केलं तरी भरून निघणार नाही आणि काही झालं तरी आम्ही सुखी होणार नाही. म्हणून आम्ही आज फाशी जात आहोत. आमच्या पश्चात आमची प्रजा कष्ट करून आणि घाम गाळून आपल्या राज्याचं नाव उजळ करील, माणसाच्या जन्माला आल्याचं सार्थक करील हीच आमची शेवटची इच्छा!

(फाशीच्या खांबाकडे जातो. राणी त्याच्या पायांवर पडते. राजा गळ्याभोवती दोरखंड अडकवून घेतो. म्होरक्या आणि साथीदार सोडून सगळे शोकभराने गुडघ्यांवर बसून वाकलेले. आतून लोकगीताचे सूर ऐकू येतात. शेतकरी बैल घेऊन तालात प्रवेशतो.)



शेतकरी : आम्ही शेतकरी.
आम्ही शेतकरी.
चला पिकवू या देशाची भाकरी.
कष्ट करा! काम करा!
कष्ट करुनी शेतकरीदादा होऽऽऽ. चला पिकवू या देशाची भाकरी!

(म्होरक्या व साथीदार गाणे म्हणत प्रवेशतात. तालात कामाला लागल्याच्या हालचाली. प्रथम राजा सामील. नंतर हळूहळू सामुदायिक काम करत असल्याच्या हालचालींत गाण्याची, तालाची, कामाची लय वाढत जाते. पडदा.)



**शब्दार्थ व टिपा :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**सुखकर्ता** – सुखी ठेवणारा. **दुःखहर्ता** – दुःख नाहीसे करणारा. **वार्ता विघ्नाची** – संकटाची बातमी. **व्याधी** – आजार. **रामबाण** – हमखास उपाय.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. राजाराणी दुःखी का होते ?

२. राजाराणीला घाम का हवा होता ?

३. प्रत्येकाने कष्ट करावेत म्हणून राजाने कोणती युक्ती योजली ?

४. हा संवाद प्रेक्षकांसमोर सादर करायचा झाल्यास कोणकोणते साहित्य लागेल त्यावर चर्चा करून त्यासंबंधीचे एक टिपण तयार करा.

५. **व्याकरण :**

काही नामे दोन किंवा तीन लिंगी असतात. उदाहरणार्थ वेळ (पुल्लिंगी, स्त्रीलिंगी), बाग (पुल्लिंगी, स्त्रीलिंगी), हरिण (पुल्लिंगी, नपुसकलिंगी), किरण (पुल्लिंगी, नपुसकलिंगी), पोर (पुल्लिंगी, स्त्रीलिंगी, नपुसकलिंगी).

(क) 'हरिण' व 'किरण' या शब्दांचा दोन लिंगांत उपयोग करून वाक्ये तयार करा.

(ख) खालील वाक्यांत जाड अक्षरांतील शब्दांबद्दल कंसात दिलेले शब्द घाला आणि जरूर ते बदल करून वाक्ये लिहा.

(अ) **राजा** नाचत येतो. (राणी)

(आ) **माळीण** बाजाराला चालली. (शेतकरी)

(इ) **माणसे** मैदानात जमली होती. (लोक)

(ई) त्यांना **सूर** ऐकू येतात. (गाणे)

६. शिक्षकांच्या मदतीने हा संवाद बसवा व तो विद्यालयाच्या स्नेहसंमेलनप्रसंगी सादर करा.

# २१. ऋतुराजाची चाहूल

आला शिशिर संपत
पानगळती सरली,
ऋतुराजाची चाहूल
झाडावेलींना लागली.

देवचाफा हा पहा ना
अंगोपांगी बहरला,
मोगराही कोवळ्याशा
पाने सजाया लागला.

डोळे खिळविती माझे
जास्वंदीची लाल फुले,
बाहव्याने येथे तेथे
सोनतोरण बांधिले.

'कुहू' गाऊन कोकिळा
करी वसंत-स्वागत,
तिलाही मी विनविते
शिकव ना मला गीत.



**शब्दार्थ व टिपा** : ****************************

**ऋतुराज** – सर्व ऋतूंमध्ये श्रेष्ठ; वसंत ऋतू. **अंगोपांगी बहरणे** – सर्व अंगांनी फुलून येणे. **सोनतोरण** – सोन्याचे तोरण.

**प्रश्न व स्वाध्याय** :

१. वसंत ऋतूत कवयित्रीला निरनिराळ्या झाडांचे कोणकोणते सौंदर्य जाणवते ?
२. कोकिळेने आपल्याला गीत शिकवावे असे कवयित्रीला का वाटते ?
३. एकूण ऋतू सहा आहेत. ते कोणते आणि ते कोणत्या महिन्यांत येतात ते सांगा.
४. तुमच्या मनाला आनंद देणाऱ्या वसंत ऋतूतील आणखी काही गोष्टींचे वर्णन करा.
५. ही कविता पुन:पुन्हा म्हणून त्यातील आनंद लुटा.



# २२. पुस्तकांच्या सहवासात

पहिल्यांदा आमची घरची स्थिती बऱ्यापैकी होती; पण पुढं पुढं ती फारच हालाखीची झाली. माझ्या वडलांना थोडंसं पेन्शन मिळत असे; पण मुंबईची राहणी आणि कुटुंबात बरीच माणसं सांभाळायची, त्यामुळं मला लागतील ती पुस्तकं आणून देणं हे आमच्या वडलांच्या आटोक्याबाहेरचं असे. तरीपण होईल ती झीज सोसून माझी हौस पुरवायला ते नेहमी तयार असत. ही गोष्ट आठवली म्हणजे मला माझ्या वडलांचा अत्यंत अभिमान वाटतो. असा प्रेमळ पिता फार थोड्यांना लाभत असेल! माझ्या अल्लड स्वभावामुळं मला त्या वेळी त्यांच्या प्रेमळपणाची किंमत कळली नाही.

त्या गोष्टी जणू काही आज घडल्यासारख्या वाटतात. स्वतःची पुस्तकं असावीत— म्हणजे फक्त स्वतःच्या मालकीची— एवढीच त्या वेळी माझी महत्त्वाकांक्षा होती. त्या महत्त्वाकांक्षेपासूनच माझं ग्रंथालय निर्माण झालं. त्या वेळीसुद्धा नवीन नवीन पुस्तकं आणून देण्यासाठी मी माझ्या वडलांजवळ हट्ट धरी. पण एखादं पुस्तक मागितलं आणि ते संध्याकाळपर्यंत त्यांनी कुठून तरी आणून दिलं नाही, असं कधी झालंच नाही!

माझ्या वडलांचं अंत:करण थोर यात शंकाच नाही. माझ्याकडून एखादया पुस्तकाची मागणी झाली, की खिशात पैसे असोत, नसोत— बहुतेक खिशात पैसे नसायचेच— आपलं मुंडासं खाकोटीस मारून माझ्या वडलांची स्वारी थेट बाहेर पडायची.

त्या वेळी माझ्या दोघीही वडील बहिणी इथं मुंबईतच असायच्या. त्यांची त्या वेळी लग्नं झालेली होती. माझे वडील जे घरून निघायचे ते थेट माझ्या धाकट्या बहिणीकडं जायचे. जे काही तीन-चार रुपये माझ्या पुस्तकासाठी हवे असतील ते तिच्यापाशी मागायचे. तिच्यापाशी तरी कोठून असणार इतके रुपये ? बिचारी 'माझ्यापाशी एवढे रुपये नाहीत' असं कळवळ्यानं म्हणायची. लगेच माझे वडील पुन्हा आपलं मुंडासं खाकोटीस मारून माझ्या थोरल्या बहिणीकडं जायचे. तिच्यापाशीही पैसे नसले म्हणजे ते तिच्याकडून एखादा दागिना मागून घेत. मग तो घेऊन एका ठराविक सावकाराकडं जात. त्याच्याकडं महिन्यासाठी तो दागिना गहाण ठेवत. महिना संपला आणि पेन्शन हाती पडलं, की ते पुन्हा त्या सावकाराच्या घरी जात. तो गहाण ठेवलेला दागिना मोडवून आणून बहिणीला पोचता करत.

माझ्यासाठी माझे वडील किती दगदग सहन करत, नाना तऱ्हांच्या अडीअडचणींना तोंड देत याची मला मात्र त्या वेळी मुळीच जाणीव नव्हती. समाजानं बहिष्कृत केलेल्या माझ्यासारख्याला थोर ग्रंथांनीच जवळ केलं. जगात त्यांच्याइतका परमस्नेही मला दुसरा कोणीही नाही. ह्या ग्रंथांनीच मला आसरा दिला. म्हणूनतर एकही पुस्तक दुसऱ्याला देणं माझ्या जीवावर येतं.

मी एकदा वाचायला किंवा लिहायला बसलो, की माझ्या साऱ्या शक्ती एकवटल्या जातात. मी रात्रभर वाचत वा लिहीत बसलो, तरी मला थोडासादेखील थकवा येत नाही. माझ्या विपुल वाचनामुळं माझी स्मरण-शक्ती तल्लख आणि प्रखर झाली आहे. अमुक ग्रंथावरील महत्त्वाचं लिखाण अमक्या ठिकाणी आहे, किंवा तमुक ग्रंथाच्या अमुक पानावर अमक्या ओळीवर हे वाक्य आहे, असं मी सांगू शकतो.

विद्या हे माझं उपास्यदैवत आहे. पुस्तकांच्या सहवासात शांत आयुष्य वेचण्यासारखा दुसरा आनंद नाही. पुस्तकं मला शिकवतात; मला नवी वाट दाखवतात. स्नेहीसोबती जोडण्याची कला माझ्या ठायी नाही. पण माणसांपेक्षा पुस्तकांचा सहवास मला अधिक आवडतो, ही गोष्ट मात्र खरी आहे.

गरिबीच्या दृष्टीनं विचार करता आजच्या गरिबांतील गरीब विद्यार्थ्यां-पेक्षा माझी त्या वेळी मोठी चांगली स्थिती होती असं नाही. मुंबईच्या एका चाळीत तीन मीटर लांब व तीन मीटर रुंद अशा एका खोलीत आईवडील, अनेक भावंडं यांच्यासह मी राहत होतो. अशा जागेत राहून एका पैशाच्या घासलेट तेलावर मी अभ्यास केला आहे.

पुढं मी विद्याभ्यासासाठी इंग्लंडमध्ये गेलो. ज्या अभ्यासक्रमाला आठ वर्षं लागतात, तो मी दोन वर्षं तीन महिन्यांत तिथं पुरा केला. मात्र हे करण्यासाठी मला दिवसाच्या चोवीस तासांपैकी एकवीस तास अभ्यास करावा लागला!

कोणताही मनुष्य सतत दीर्घोद्योगानं ज्ञानी होऊ शकतो हेच खरं.

**शब्दार्थ व टिपा :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**महत्त्वाकांक्षा** – एखादे महान ध्येय किंवा गोष्ट मिळवण्याची तीव्र इच्छा. **बहिष्कृत** – जातीबाहेर, समाजाबाहेर टाकलेला; वाळीत टाकलेला. **तल्लख** – चलाख; चपळ. **उपास्यदैवत** – उपासना करण्याचे दैवत; पूज्य गोष्ट. **दीर्घोद्योग** – बराच काळ परिश्रमांनी करायचे काम.

**वाकप्रचार :**

**आयुष्य वेचणे** – आयुष्य घालवणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. डॉ. आंबेडकरांची लहान वयात कोणती महत्त्वाकांक्षा होती ?
२. जवळ पैसे नसतानाही त्यांचे वडील मुलाची पुस्तकाची हौस पुरवत, ती कशी ?
३. डॉ. आंबेडकरांनी 'परमस्नेही' कोणाला म्हटले आहे ? का ?
४. विद्याभ्यास करताना त्यांना कोणत्या अडचणी आल्या ? त्यांतूनही त्यांनी कसा मार्ग काढला ?

५. 'पण' या शब्दाचे अनेक अर्थ होतात — (१) परंतु, (२) पैज, (३) प्रतिज्ञा, (४) सुद्‌धा, देखील, ही (शब्दाला जोडून येणारी).

'सुद्‌धा', 'देखील', 'ही' हे शब्द जसे त्यामागील शब्दांना जोडून लिहितात, तसाच त्या अर्थाचा 'पण' हा शब्दही मागील शब्दाला जोडून लिहितात. जसे— तरीपण होईल ती झीज सोसून माझी हौस पुरवायला ते नेहमी तयार असत.'

'सुद्‌धा', 'देखील', 'ही' आणि 'पण' हे एकाच अर्थाचे शब्द खालील शब्दांना जोडून स्वतंत्र वाक्ये तयार करा आणि ती वहीत लिहा.

आम्ही, बहीण, तू, पाऊस.

६. **व्याकरण :**

खाली दिलेल्या दोन गटांतील वाक्ये वाचा.

| गट १ | गट २ |
| --- | --- |
| (अ) माझी **बहीण** इथेच असायची. | माझ्या **बहिणी** प्रेमळ होत्या. |
| (आ) मी मागितलेले **पुस्तक** ते आणून देत. | **पुस्तके** मला शिकवतात. |

पहिल्या गटातील 'बहीण' व 'पुस्तक' ही नामे आहेत. त्यांवरून एक बहीण, एक पुस्तक असे आपल्याला कळते. बहीण, पुस्तक ही नामे एकवचनी आहेत. दुसऱ्या गटातील वाक्यात 'बहिणी' व 'पुस्तके' ही नामे आहेत. त्यांवरून एकापेक्षा अधिक बहिणी, एकापेक्षा अधिक पुस्तके असे आपल्याला कळते. 'बहिणी', 'पुस्तके' ही नामे अनेकवचनी आहेत.

आता खालील वाक्य वाचा.

माझे **वडील** फार प्रेमळ होते.

वडील ही एक व्यक्ती असूनही त्यांचा उल्लेख अनेकवचनी केला आहे, कारण वडलांविषयी आपल्याला आदर वाटतो. इथे 'वडील' हे आदरार्थी बहुवचन आहे.

(क) खालील वाक्यांत आलेली नामे व त्यांची वचने ओळखा.

(१) सासूबाई गावाला जातील. (२) त्या झाडाच्या चिंचा छान आहेत.

(३) रात्री चांदण्या चमचमतात. (४) गुरुजी वर्गात आले.

(ख) (१) खालील नामांची अनेकवचनी रूपे सांगा.

दागिना, अडचण, गाणे, झोपडी, खिसा, पाखरू.

(२) खालील नामांची एकवचनी रूपे सांगा.

पैसे, बिया, लिंबे, गोळ्या, विडे, खेळणी.

७. या पाठात काही सुभाषिते आली आहेत. ती शोधून काढा आणि वळणदार अक्षरांत त्यांच्या पट्ट्या तयार करून त्यांत रंग भरा.

---

# २३. आसू आणि हसू

आमच्या सर्कशीनं सिकंदराबादला मुक्काम केला. तिथून छोटीमोठी गावं घेत आम्ही खेळू लागलो. मी विदूषकाचं काम करत होतो. विदूषक हा तर सर्कशीचा प्राण. आपल्या कामानं त्याला सर्वांची मनं जिंकावी लागतात. त्या कामात मी खूपच वाकबगार होतो. नव्या नव्या गमती करत होतो.

काहीतरी युक्त्या करून प्रेक्षकांना हसत ठेवायचं; कारण वाघसिंहांच्या डरकाळ्या ऐकून त्यांना भीती वाटते. कसरतीची अचाट कामं पाहून त्यांच्या मनावर ताण येतो. ती भीती दूर व्हावी, त्यांच्या मनावरचा ताण सैल पडावा यासाठी त्यांना हसायला लावायचं. म्हणून नेहमी वेगवेगळ्या नकला मी बसवत होतो. पळत्या घोड्यावर उडी मारून बसणं हे तर नेहमीचंच होतं. कसरती करता करता घोड्यावर उभं राहायचं, कपडे काढायचे आणि अनेक गमती करत राहायचं. यात विदूषकी चाळ्यांबरोबरच कसरतींतल्या कौशल्यालाही महत्त्व असायचं.

आंध्रमधल्या अनंतपूर गावची गोष्ट. एका खेळात माझा कार्यक्रम चालू होता. घोड्यावर मी कसरती करत होतो. कपड्यांमागून कपडे काढून टाकत होतो. प्रेक्षक हसून हसून बेजार होत होते. माझा कार्यक्रम संपला आणि टाळ्यांचा गजर झाला. अभिवादन करून मी विंगेत आलो.

आणि त्या क्षणी मला जाणवलं— आपल्या गुडघ्यात लचक भरली आहे! डावा पाय टेकवताच येईना. मघाशी घोड्यावर उडी मारता मारता काहीतरी चुकलं होतं. किंचित दुखावल्यासारखं वाटलं होतं; पण रिंगणातल्या बेहोशीत ते पुरतं कळलं नव्हतं. नेहमीसारखं काम करून गेलो होतो.

मी लंगडतो आहे असं पाहून माझे वडील बंधू दादासाहेब पुढं आले. त्यांनी हात धरून मला आपल्या राहत्या तंबूत नेलं. लगेच डॉक्टरांना बोलावलं. तोपर्यंत गुडघ्याला सूज आली होती.

सूज पाहिली आणि बालपणचा माझा तो गुडघ्याचा आजार डोळ्यांसमोर आला. त्या वेळी कुठं बाहेर जायचं असलं तर आईच्या कडेवर बसणं...

घरातल्या घरात खुरडत खुरडत फिरणं... सगळं आठवलं. मन विषण्ण झालं. वाटलं, तशीच पाळी तर पुन्हा येणार नाही ना ? आणि तीही या वयात ?

डॉक्टर तपासता तपासता म्हणाले, "सणक भरली आहे. पण जपायला हवं. चारआठ दिवस पूर्ण विश्रांती दिली पाहिजे पायाला."

ऐकलं आणि सुन्न झालो. हे कसं शक्य होतं ? मी असा पाय धरून बसलो म्हणजे माझा तो कार्यक्रमच संपला !

दुसऱ्या दिवशी खेळ सुरू झाला. त्यात माझा कार्यक्रम कुठंच नव्हता. नेहमी येणाऱ्या प्रेक्षकांच्या हे लक्षात आल्याबरोबर त्यांनी आरडाओरडा करायला सुरवात केली. बाकीच्या विदूषकांबरोबर मी दिसेना म्हणून त्यांनी गडबड सुरू केली. म्हणता म्हणता सगळ्या तंबूत गोंधळ माजला.

लोकांचा राग आणि प्रेम मोठं विलक्षण असतं !

सर्कशीचे व्यवस्थापक माझ्या तंबूत आले. ते काय सांगणार हे मी ओळखलंच. कसाबसा उभा राहिलो. विदूषकाचे कपडे चढवले, तोंड रंगवलं आणि लंगडतच रिंगणात आलो.



मला पाहिल्याबरोबर टाळ्या पडल्या; पण माझ्या गुडघ्यात मात्र कळा मारू लागल्या. रिंगणात उभा राहिलो. गुडघ्याला लागलं आहे अशा अर्थाच्या खुणा करू लागलो. आंध्रातल्या त्या प्रेक्षकांची भाषा मला कुठं येत होती? खुणांबरोबरच हिंदी भाषेचाही मी उपयोग करत होतो; पण त्या हशा-टाळ्यांच्या जल्लोशात माझं बोलणं त्यांना थोडंच ऐकू जाणार? म्हणून मी आणखीनच खुणा करू लागलो. पुन्हा पुन्हा लंगडत चालून दाखवलं.

तो काय आश्चर्य! माझ्या त्या खुणा आणि माझं ते चालणंच प्रेक्षकांना हसवू लागलं. एकीकडं गुडघ्यावर भार पडत होता. साऱ्या शरीरात वेदना पसरत होत्या; पण प्रेक्षकांना त्या कशा कळणार? माझं लंगडणं त्यांना विनोदी वाटत होतं. टाळ्या झडत होत्या. मलाही त्या टाळ्यांची झिंग चढली आणि मी बेभान झालो. प्रेक्षक हसतच होते. टाळ्या झडतच होत्या. मी चक्रावल्यासारखा रिंगणात फिरतच होतो.

आणि एक क्षण असा आला, की फिरता फिरता मी गपकन थांबलो. तिथंच भेलकांडलो आणि पडलो.



दुसऱ्याच क्षणी कडकडकणाऱ्या टाळ्या थांबल्या.

'हे खरं नाही! .... प्रेक्षक हसले पाहिजेत. त्यासाठीच तर माझा जन्म...' मी एकसारखा मनाला बजावत होतो, 'नाही नाही... कोणत्याही परिस्थितीत त्यांच्या पैशाचा मोबदला त्यांना मिळायलाच हवा.'

मी ताडकन उभा राहिलो. विंगेकडं तोंड करून घोडा आणायला फर्मावलं.

प्रेक्षक स्तब्ध होते.

घोडा आला आणि रिंगणात फेऱ्या मारू लागला. प्रेक्षक पुन्हा टाळ्या वाजवू लागले. मग मलाही स्फुरण चढलं. त्या पळत्या घोड्यावर मी उडी मारली आणि त्या क्षणी गुडघ्यातून पुन्हा कळ उठली.

हा अबलख घोडा मोठा चतुर होता. आपल्या मालकाला काहीतरी होत आहे हे त्याला नुसत्या स्पर्शानंच कळलं. त्यानं रिंगणात एक फेरी मारली आणि मी काही कसरत सुरू करण्याच्या आतच तो मला घेऊन रिंगणाबाहेर गेलासुद्धा.

विंगेत येईतो मी घामाघूम झालो होतो.

अजूनही बाहेर टाळ्या पडतच होत्या.

आश्चर्याची गोष्ट अशी, की रात्रीपर्यंत गुडघा दुखायचा साफ थांबला. काल उडी मारताना हललेली शीर आज पुन्हा उडी मारताना जागेवर आली होती!

डॉक्टरांचं म्हणणं काहीही असो; पण मला मात्र वाटत होतं— प्रेक्षकांच्या हशांनी आणि टाळ्यांनीच मला एक दिवसात बरं केलं!

**शब्दार्थ व टिपा :** ***************************

**वाकबगार** – निपुण, कुशल. **विंग** – सर्कशीच्या रिंगणात जाण्यायेण्यासाठी पडदा लावलेला तंबूतील मार्ग. **विषण्ण** – खिन्न, निरुत्साही. **सुन्न होणे** – काहीही न सुचणे. **झिंग** – धुंदी, कैफ. **भेलकांडणे** – तोल जाणे. **अबलख** – पांढऱ्या व काळ्या अशा दोन रंगांचा, चित्रविचित्र रंगांचा.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. विदूषक हाच सर्कशीचा प्राण, असे लेखकाने का म्हटले आहे ?

२. प्रेक्षकांनी आरडाओरडा करायला सुरवात का केली ?

३. गुडघा दुखत असूनही विदूषकाला रिंगणात का यावे लागले ?

४. या पाठाला 'आसू आणि हसू' हे नाव का दिले आहे ?

५. 'म्हणता म्हणता सगळ्या तंबूत गोंधळ माजला.'
'म्हणता म्हणता' म्हणजे अगदी थोड्या वेळात.
खालील शब्दांपासून 'म्हणता म्हणता' यासारखे शब्द तयार करा आणि त्यांचा वाक्यात उपयोग करा.
बघणे, बोलणे, हसणे, करणे, पाहणे.

६. **व्याकरण:**

(अ) काही नामांची एकवचनी व अनेकवचनी रूपे सारखीच असतात. जसे –
देव, भाषा, पेरू, दिवस. आज्ञा, विद्यार्थी, केस.
खालील नामांचा एकवचनी व अनेकवचनी उपयोग करून वाक्ये लिहा..
घंटा, चेंडू, दिशा, कागद.

(आ) काही नामे फक्त एकवचनी असतात. जसे –
पाणी, दही, मीठ, सोने, आकाश, कापूस.
अशा प्रकारची आणखी काही नामे शोधा.

(इ) पुढे काही नामे दिली आहेत. त्यांची योग्य रूपे खालील वाक्यांतील रिकाम्या जागी भरा.
नक्कल, टाळी, किल्ला, वर्तमानपत्र, नारळ.
वाक्ये: (अ) सुटीत आम्ही जवळचे........पाहिले.
(आ) मी नेहमी वेगवेगळ्या.........बसवत होतो.
(इ) त्यांनी झाडावरचे........ उतरवले.
(ई) ............ आपल्याला माहिती देतात.
(उ) प्रेक्षक पुन्हा........वाजवू लागले.

७. या पाठात विदूषकाचे दुःख घोड्याने ओळखले होते, असे म्हटले आहे. मनुष्याच्या सुखदुःखात सहभागी होऊन त्याचे मित्र बनणारे असे आणखी काही प्राणी आहेत. जसे – हत्ती, कुत्रा इत्यादी. त्यांच्या अशा काही कथा मिळवून त्या वर्गात सांगा.

---

# २४. रक्तदान! नव्हे, जीवदान!

कोल्हापूरच्या सरकारी इस्पितळातील ऑपरेशन-विभागात धावपळ चालू होती. ऑपरेशन-टेबलावर एक खेडूत स्त्री निपचित पडली होती. बैलाने शिंग मारून भोसकल्यामुळे ती जबर जखमी झाली होती. तिला झालेली जखम तपासून डॉक्टरांनी तिचे तावडतोब ऑपरेशन करायचे ठरवले.

त्या बेशुद्ध स्त्रीच्या जखमेतून बरेच रक्त गेले होते. ऑपरेशनपूर्वी तिच्या शरीरात रक्त भरणे आवश्यक होते. म्हणून तिचे रक्त कोणत्या गटाचे आहे याची डॉक्टरांनी तपासणी केली. तिच्या रक्ताचा गट शोधला खरा; पण तो दुर्मिळ असल्यामुळे डॉक्टर चिंतेत पडले. त्या गटाचे रक्त दवाखान्याच्या संग्रहात शिल्लक नव्हते. म्हणून ते मिळवण्यासाठी प्रयत्न सुरू झाले.

पण तशा रक्तगटाचा माणूस मिळत नव्हता. त्या स्त्रीचा प्राण तर अत्यंत धोक्यात होता. प्रत्येक क्षण महत्त्वाचा होता.

हवे ते रक्त न मिळाल्यामुळे डॉक्टर काहीही करू शकले नाहीत. अखेर ती बिचारी प्राणाला मुकली.

इस्पितळातील आपले काम संपवून घरी परत निघालेला एक कर्मचारी हे करुण दृश्य पाहत होता. त्याचे डोळे अश्रूंनी भरून आले. जड पावलांनी तो चालू लागला.

काही अंतरावर सायकलचे एक दुकान होते. घरी परत जाताना त्या दुकानात थोडा वेळ थांबायचे आणि तेथील मित्रांशी चार गोष्टी करून पुढे जायचे असा त्याचा शिरस्ता होता.

नेहमीसारखाच आज तो त्या दुकानात गेला. त्याचा चेहरा गंभीर व कष्टी दिसत होता. इस्पितळात घडलेला सारा प्रसंग त्याने आपल्या मित्रांना सांगितला.

ती हकीकत ऐकून त्या तरुणांना फार दुःख झाले. जबर जखमी झालेल्या किंवा गंभीर आजार झालेल्या माणसाला वेळेवर रक्त देणे आवश्यक असते हे त्यांना माहीत होते.



ते महाविद्यालयात शिकत होते तेव्हाची त्यांना आठवण झाली. एका प्रसिद्ध डॉक्टरांचे भाषण त्यांनी ऐकले होते. ते डॉक्टर म्हणाले होते, 'विद्यार्थिमित्रांनो, तुम्ही रक्तदान करण्यासाठी पुढं झालं पाहिजे. आपल्या रक्तानं एका माणसाचे प्राण वाचवल्याचं समाधान तुम्हांला मिळेल. आम्ही डॉक्टर तुमच्या रक्ताची तपासणी करू. ते कोणत्या गटाचं आहे ते ठरवू. मग तुम्ही द्याल ते रक्त आमच्या रक्तपेढीतल्या वेगवेगळ्या गटांत शास्त्रीय पद्धतीनं साठवून ठेवू. गरजू माणसाला आमच्या रक्तपेढीतून रक्त दिलं जाईल. त्यामुळं त्या माणसाचे प्राण वाचतील. मानवतेची ही फार मोठी सेवा तुमच्या हातून घडेल.'

डॉक्टरांच्या या भाषणाने भारावून जाऊन त्या तरुणांनी आपलं रक्त रक्तपेढीला दिलं होतं.

आज त्या खेडूत स्त्रीची हकीगत ऐकताना त्यांना ही जुनी आठवण झाली. त्याबरोबरच आपण नंतर कधीच रक्त दिले नाही याचे त्यांना वाईटही वाटले. योग्य गटाचे रक्त मिळाले नाही म्हणून पुन्हा कोणाचा मृत्यू होऊ नये यासाठी आपल्यापरीने शक्य ते सर्व करण्याचा त्यांनी निश्चय केला.

ते डॉक्टरांकडे गेले. आपापल्या रक्ताची तपासणी करून घेऊन ते कोणत्या गटाचे आहे यासंबंधीचे कार्ड त्यांनी मिळवले. एका मोठ्या वहीत आपली नावे लिहून त्यापुढे आपल्या रक्ताचा गटही लिहून ठेवला. वहीवर त्यांनी आपल्या मंडळाचे नाव लिहिले— 'रक्तदान-पेढी'. या पेढीचे ते पहिले पाच सभासद होते. आपल्या या पेढीचे कार्यालय त्यांनी त्या सायकलीच्या दुकानातच सुरू केले.

या रक्तदानपेढीची माहिती शहरातील प्रमुख इस्पितळांतल्या डॉक्टरांना भेटून त्यांनी दिली.' जेव्हा गरज पडेल तेव्हा बोलवा, आपण आनंदानं रक्त देऊ,' असे ते डॉक्टरांना म्हणाले.

एके दिवशी एका इस्पितळातून निरोप आला— 'रक्ताची गरज आहे. तातडीनं या.

त्या पाचही जणांनी इस्पितळाकडे धाव घेतली. हव्या असलेल्या रक्तगटाच्या तरुणाने आपले रक्त दिले आणि इस्पितळातल्या त्या रुग्णाचे प्राण वाचले.

त्या रुग्णाच्या नातलगांनी त्यांचे आभार तर मानलेच; पण त्या तरुणांना पैसेही देऊ केले. त्यांनी ते पैसे घेण्याचे नम्रपणे नाकारले. एक जीव वाचवल्याच्या असीम आनंदात ते परतले.

त्या तरुणांची ती एक जणू चालतीबोलती रक्तपेढी होती. ना मोटारगाडी, ना यंत्रे, ना रक्त साठवण्याच्या खास बाटल्या, ना कोणी नोकर. कुणी हाक मारायचा अवकाश, हे तरुण रक्त देण्यासाठी धावू लागले.



त्यांच्या या विनामूल्य सेवेचा प्रभाव पडून इतरही बरेच तरुण त्यांच्या कार्यात सहभागी होऊ लागले. त्या सभासदांत भिन्नभिन्न रक्तगटांची मुले तर होतीच, पण काही अतिशय दुर्मिळ रक्तगटांचीही मुले होती. त्यामुळे गरजेला वाटेल त्या गटाचे रक्त या पेढीच्या सभासदांकडून मिळू लागले.

एकदा कोल्हापूरनजिकच्या पन्हाळ्याला मोटार व रिक्षा यांची टक्कर झाली. रिक्षाचा ड्रायव्हर गंभीर जखमी झाला. त्याला जवळच्या इस्पितळात दाखल करण्यात आले; पण तिथे त्याच्यासाठी हव्या असलेल्या गटाचे रक्त नव्हते.

तिथल्या एका कर्मचाऱ्याला कोल्हापुरातील या रक्तदान-पेढीची ऐकीव माहिती होती. ताबडतोब तिकडे निरोप धाडण्यात आला. हव्या असलेल्या रक्तगटाचा एक विद्यार्थी पेढीचा सभासद होता. तो तातडीने त्या इस्पितळात गेला आणि त्याने रक्तदान केले. रिक्षाच्या ड्रायव्हरचे प्राण वाचले.

रक्तदान-पेढीचे सभासद रक्त घेणाऱ्यांकडून फक्त प्रवासखर्चापुरते पैसे स्वीकारत; पण त्या रिक्षाड्रायव्हरची अडचणीची परिस्थिती पाहून त्या तरुणाने तेही पैसे घेतले नाहीत!

रक्त देणे म्हणजे आजाऱ्याला प्राणाचे दानच करण्यासारखे आहे. रक्ताचे गट होतात ते त्याच्या गुणधर्मांवरून. मग ते कोणत्याही धर्माच्या, जातीच्या किंवा भाषेच्या माणसाचे असो, ती व्यक्ती पुरुष असो वा स्त्री असो, ते रक्त रुग्णाला जीवदानच देते; जातपात मानत नसते.



**शब्दार्थ व टिपा :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**प्राणाला मुकणे** – मरणे. **कर्मचारी** – नोकर. **शिरस्ता** – प्रघात; पद्धत; वहिवाट. **रुग्ण** – रोगी. **असीम** – मर्यादा नसलेले; अतिशय.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. खेडूत स्त्रीला कशामुळे प्राणास मुकावे लागले ?

२. डॉक्टरांनी विद्यार्थ्यांना कोणत्या कार्याचे महत्त्व पटवून दिले ?

३. त्या तरुणांची रक्तपेढी 'चालतीबोलती' होती असे का म्हटले आहे ?

४. 'रक्ताची गरज आहे, तातडीनं या' असा निरोप येताच त्या तरुणांनी काय केले ?

५. माणसामाणसांतील कोणते भेद रक्तात नसतात ?

६. 'कुणी हाक मारायचा अवकाश, हे तरुण रक्त देण्यासाठी धावू लागले.'
या वाक्यात 'कुणी हाक मारायचा अवकाश' याचा अर्थ 'हाक मारल्यावर लागलीच' असा आहे. खालील वाक्यांत जरूर ते बदल करून 'अवकाश' या शब्दाचा वरील प्रकारे उपयोग करा आणि ती पुन्हा लिहा.
(अ) सुटी लागली, आणि लागलीच आम्ही सहलीला निघालो. (आ) पाऊस पडला आणि लागलीच सगळा उकाडा नाहीसा झाला. (इ) आईने खाऊचा डबा उघडला आणि लागलीच मुले तिच्याकडे धावत गेली.

७. **व्याकरण :**
पुढील वाक्ये वाचा.
(१) विद्यार्थी भाषण **ऐकतात.**
(२) विद्यार्थ्यांनी भाषण **ऐकले.**
(३) विद्यार्थी भाषण **ऐकतील.**

पहिल्या वाक्यातील 'ऐकतात' या क्रियापदावरून ऐकण्याची क्रिया सध्या घडत असल्याचे समजते. म्हणून हा वर्तमानकाळ आहे.

दुसऱ्या वाक्यातील 'ऐकले' या क्रियापदावरून ऐकण्याची क्रिया पूर्वी घडल्याचे समजते. म्हणून हा भूतकाळ आहे.

तिसऱ्या वाक्यातील 'ऐकतील' या क्रियापदावरून ऐकण्याची क्रिया पुढे कधीतरी घडणार असल्याचे समजते. म्हणून हा भविष्यकाळ आहे.

खालील वाक्यांतील क्रियापदांचे काळ ओळखा.
(अ) काही अंतरावर सायकलचे एक दुकान होते.
(आ) एखादयाचे प्राण तुमच्या रक्तामुळे वाचतील.
(इ) रक्त जीवदान देते.
(ई) पुढच्या महिन्यात मृगाचा पाऊस पडेल.
(उ) आम्ही श्रमदान करतो.
(ऊ) सर्कस दुसऱ्या गावाला गेली.

८. एखादया अपंग माणसाला मदत करण्यासाठी तुम्ही काय काय करू शकाल ?

# २५. कष्टेंवीण फळ नाहीं

– रामदास

यत्नाचा लोक भाग्याचा । यत्नेंवीण दरिद्रता ।
उमजला लोक तो धाला । उमजेना तो हपापिला ॥१॥



केल्यानें होत आहे रे । आधीं केलेंचि पाहिजे ।
यत्न तो देव जाणावा । अंतरी धरितां बरें ॥ २ ॥

कष्टेंवीण फळ नाहीं । कष्टेंवीण राज्य नाहीं ।
केल्यावीण होत नाहीं । साध्य जनीं ॥ ३ ॥

आधीं कष्टाचें दुःख सोसिती । ते पुढें सुखाचें फळ भोगती ।
आधीं आळसें सुखावती । त्यां पुढें दुःख ॥ ४ ॥

जेहीं उदंड कष्ट केले । ते भाग्य भोगून ठेले ।
येर ते बोलतचि राहिले । करंटे जन ॥ ५ ॥

कोणी येक काम करितां होतें । न करितां तें मागें पडतें ।
याकारणें ढिलेंपण तें । असोंचि नये ॥ ६ ॥

जो दुसऱ्यावरी विश्वासला । त्याचा कार्यभाग बुडाला ।
जो आपणचि कष्टत गेला । तोचि भला ॥ ७ ॥

**शब्दार्थ व टिपा** : * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**धाणे** – तृप्त होणे; समाधान पावणे. **अंतरीं** – मनात. **जनीं** – जनांत. **जेंही** – ज्यांनी. **येर** – दुसरे; इतर. **करंट्या** – अभागी.

**प्रश्न व स्वाध्याय** :

१. कोणाला देव मानावे असे रामदास म्हणतात ?
२. सुखाचे फळ कोणाला मिळते ?
३. कोणता मनुष्य भला असतो असे रामदासांना वाटते ? का ?
४. (अ) या पाठातील काही सुवचने खाली दिली आहेत. त्यांचा अर्थ तुमच्या शब्दांत लिहा.
   १. यत्न तो देव जाणावा.
   २. कष्टेंवीण फळ नाहीं.
   ३. जो दुसऱ्यावरी विश्वासला । त्याचा कार्यभाग बुडाला ॥
   (आ) 'विश्वास' या शब्दापासून 'विश्वासणे' हा शब्द तयार होतो. पुढे दिलेल्या शब्दांपासून अशा प्रकारचे शब्द तयार करा.
   फूल, उद्गार, बहर, आनंद, रंग.
५. प्रयत्नाने यशस्वी झालेल्यांच्या काही गोष्टी मिळवा आणि त्या वर्गसभेत सांगा.

---

# २६. सर्वस्वाचा त्याग

दुसरे महायुद्ध चालू होते. इंग्रज सरकारच्या सैन्यातील हजारो भारतीय सैनिक भारताबाहेर इंग्रजांच्या बाजूने लढत होते. भारतीय सैनिकांनी त्यांच्यासाठी न लढता भारत स्वतंत्र करण्यासाठी लढायला हवे, असे देशगौरव सुभाषचंद्र बोस यांना वाटत होते. त्यासाठी त्या सैनिकांची मने वळवण्याचा त्यांनी निश्चय केला.

सुभाषचंद्रांच्या हालचालींवर इंग्रज सरकारचा सक्त पहारा होता; पण सरकारला शिताफीने चकवून सुभाषचंद्र भारताच्या पूर्वेकडील देशांत गेले. तेथे त्यांनी भारतीय सैनिकांना देशाच्या स्वातंत्र्यासाठी लढण्याची हाक दिली. त्या हाकेस 'ओ' देऊन हजारो भारतीय सैनिक इंग्रजांच्या सेवेतून बाहेर पडले आणि सुभाषचंद्रांना येऊन मिळाले.



त्या सर्व सैनिकांना घेऊन सुभाषचंद्रांनी 'आझाद हिंद सेना' स्थापन केली. ते सारे सैनिक त्यांना 'नेताजी' म्हणू लागले.

आझाद हिंद सेनेत सैनिकांप्रमाणेच अनेक स्त्रियांही सामील झाल्या. स्त्रीसैनिकांची एक स्वतंत्र तुकडीच करण्यात आली.

नेताजी त्या सेनेच्या कवायती घेत. सैनिकांसमोर बोलताना वीरश्री त्यांच्या रोमरोमांत संचरू लागे.

सभेत बोलताना नेताजी सांगत— 'भाइयो और बहनो! आपली मातृभूमी स्वतंत्रतेची मागणी करत आहे; पण स्वतंत्रता अशीतशी का मिळते? तिच्यासाठी सर्वस्वाचं बलिदान करायला आपण तयार असलं पाहिजे.

तुम मुझे खून दो।<br>
मैं तुम्हें आज़ादी दूँगा॥<br>
कोणकोण तयार आहात, बोला!'

एकदा त्यांनी सभेत श्रोत्यांना अशी हाक दिली असता हजारो युवकांनी हात वर केले. नेताजी म्हणाले, "असं नाही. प्रत्येकानं प्रतिज्ञापत्रावर आपल्या रक्तानं सही केली पाहिजे."

ताबडतोब ते युवक पुढे सरसावले. त्यांनी प्रतिज्ञापत्रांवर आपल्या रक्तानं सह्या केल्या. नेताजींच्या जयजयकारानं सभा दणाणून गेली.

तो दिवस २६ जानेवारी १९४४ हा होता. नेताजींनी ब्रम्हदेशाची राजधानी रंगून येथे भारताचा स्वातंत्र्यदिन साजरा केला. त्या प्रसंगी मोठी सभा झाली. दुरदुरच्या अंतरावरून हजारो लोक त्या सभेला आले होते.

सभेच्या आरंभी नेताजींना अनेक हार घालण्यात आले. त्यानंतर त्यांचे स्फूर्तिदायक भाषण झाले. ते ऐकताना श्रोत्यांच्या अंगांवर रोमांच उभे राहिले. भारताच्या स्वातंत्र्याचा ते जयजयकार करू लागले.

भाषण संपल्यावर नेताजी एक हार हातात घेऊन म्हणाले, "स्वातंत्र्य मिळवण्यासाठी सज्ज झालेल्या आपल्या सेनेला पैशाची मदत हवी आहे. मग बोला, या हाराचं मोल तुम्ही काय देणार ?"

या अभूतपूर्व लिलावातील सवाल व बोली सुरू झाली. एका युवकाचे डोळे त्या हारावर खिळून होते. वाटेल तेवढी किंमत देऊन तो हार घ्यायचाच, असा त्याने दृढनिश्चय केला होता. कारण नेताजींच्या गळ्यातला हार त्याला हवा होता — एक अमोल ठेवा म्हणून !

सवाल चढत गेले. बोली वाढत गेल्या. वाढता वाढता पाच लाखांवर बोली गेली. मग तो युवक वेगाने पुढे आला आणि म्हणाला, "माझी सर्व संपत्ती मी या हारासाठी अर्पण करतो ! "

सुभाषबाबू गहिवरले. दुसऱ्या दिवशी त्या तरुणाला बोलावून ते म्हणाले, "अरे, असं करू नको. आपल्यापुरतं काहीतरी राखून ठेव."

त्या तरुणाने उत्तर दिले, "छे, छे! नेताजी, असं होणार नाही. मी स्वतः च आता आझाद हिंद सेनेत दाखल होणार आहे. तेव्हा माझ्यासाठी राखून काय ठेवायचं ?"

आझाद हिंद सेनेने स्वतंत्र भारताचे सरकार स्थापन केले होते. त्याच्या पहिल्या वाढदिवशी नेताजींची दागिन्यांनी तुला करण्याचे महिलांनी ठरवले. त्या तुलेने मिळणारी सर्व संपत्ती स्वातंत्र्यसेनेसाठीच उपयोगी पडणार होती.

एक मोठा तराजू सजवण्यात आला. दोन्ही पारड्यांना सुवासिक पुष्पहार गुंफले होते. सुवासिनींनी नेताजींना ओवाळले. त्यांच्या कपाळावर कुंकुम-तिलक लावला. मग त्यांना एका पारड्यात बसवले. जमलेल्या स्त्रियांनी

आपल्या अंगावरील सगळे सोन्याचे दागिने दुसऱ्या पारड्यात भराभर टाकले. एका गुजराती महिलेने तर आपल्याजवळच्या सोन्याच्या पाच विटा त्या पारड्यात टाकल्या. आपला पती इंग्रजांशी लढता लढता कामी आला असे समजल्यामुळे एका तरुण स्त्रीने आपले मंगळसूत्र त्या पारड्यात टाकले. दोन्ही पारडी हळूहळू सारखी होऊ लागली; पण दागिने ठेवलेल्या पारड्याचे वजन अजून थोडे कमी भरत होते. इतक्यात एक नवल घडले.

एक वृद्ध स्त्री पुढे येताना दिसली. लोकांना वाटले, ती नेताजींना नमस्कार करण्यासाठी पुढे येत असावी. तिच्या हातांत सोन्याची फ्रेम असलेला एक फोटो होता. लढता लढता कामी आलेल्या तिच्या एकुलत्या एका मुलाचा तो फोटो होता. आजवर तिने तो प्राणापलीकडे जपून ठेवला होता. तो एकवार तिने हृदयाशी घट्ट धरला आणि पारड्यात ठेवला. आणि काय आश्चर्य! तुला भरली! तिच्या चेहऱ्यावर मोठे समाधान विलसले. डोळ्यांतून आनंदाश्रू वाहू लागले.

ती वृद्ध महिला कोण होती ? ती एक गुरखा स्त्री होती. तिचे नाव लक्ष्मी होते. मागे अशाच एका प्रसंगी नेताजींनी हाक दिली असताना ती पुढे आली होती आणि म्हणाली होती, "माझा हा एकुलता एक मुलगा — मानबहादूरसिंह. हा माझं सर्वस्व आहे. आपण देशासाठी सर्वस्व मागता ना? तेच मी देते. याला तुमच्या सैन्यात घ्या."

त्याच मातेने आज आपल्या मुलाचा फोटो असलेली सोन्याची फ्रेमही नेताजींना अर्पण केली होती!

नेताजींचे मन भरून आले. त्यांनी त्या थोर मातेला प्रणाम केला आणि ते म्हणाले, "माताजी, तुम्ही धन्य आहात! ज्या देशातल्या स्त्रिया असा सर्वस्वाचा त्याग करायला तयार आहेत, तो देश स्वतंत्र झाल्याशिवाय कसा राहील ?"



**शब्दार्थ व टिपा** : ******************************

**सर्वस्व** – सर्व संपत्ती; आपल्याजवळचे सर्व काही. **स्फूर्तिदायक** – चांगले काम करण्याची तीव्र इच्छा उत्पन्न करणारे; प्रेरणा देणारे. **अभूतपूर्व** – पूर्वी कधीही न झालेला. **लिलाव** – चढाओढीने सर्वांत जास्त किंमत बोलणाऱ्यास माल विकणे. **तुला** – तराजूने केलेले सारखे वजन.

**वाक्प्रचार** :

**कामी येणे** – मरण पावणे. **रोमरोमांत संचरणे** – संपूर्ण शरीरात भरून जाणे. **अंगावर रोमांच उभे राहणे** – थरारून जाणे.

**प्रश्न व स्वाध्याय** :

१. सुभाषचंद्रांनी 'आझाद हिंद सेना' केव्हा व कशी स्थापन केली ?
२. त्यांनी तरुणांकडे स्वातंत्र्यासाठी कशाची मागणी केली ?
३. 'आपल्यापुरतं काहीतरी राखून ठेव,' असे नेताजी कोणाला म्हणाले ? का ?
४. नेताजींची दागिन्यांनी तुला करताना कोणते नवल घडून आले ?
५. या पाठास 'सर्वस्वाचा त्याग' हे नाव का दिले आहे ?
६. (अ) 'स्वतंत्रता अशीतशी का मिळते ?' याचा अर्थ स्वतंत्रता मिळवण्यासाठी फार परिश्रम करावे लागतात असा आहे. खालील शब्दांचा उपयोग करून अशा प्रकारची वाक्ये तयार करा.
शरीरसामर्थ्य, नावलौकिक, विद्या.
(आ) 'स्फूर्ती' या शब्दापासून 'स्फूर्तिदायक' हा शब्द तयार झाला आहे. खालील शब्दांपासून असे शब्द तयार करा.
शक्ती, आनंद, भीती, लाभ.
७. **व्याकरण** :
१. कंसातील शब्दांची योग्य रूपे रिकाम्या जागी भरा.
(अ) भाषण संपल्यावर नेताजींनी एकेका हाराचा लिलाव... (करणे)
(आ) तुमच्या सेनेत सामील होऊन मी यापुढे देशासाठी... (लढणे)
(इ) सुभाषचंद्रांची जीवनकथा आजही स्फूर्ती... (देणे)
(ई) आगगाडी एक तास उशिरा... (येणे)
(उ) खेळल्यानंतर आम्हांला सपाटून भूक... (लागणे)
(ऊ) उद्याच्या शर्यतीत तू...का ? (धावणे)
२. कंसात सुचवल्याप्रमाणे पुढील वाक्यांतील काळ बदला आणि त्यासाठी वाक्यात जरूर ते इतर बदल करा.

(अ) तिने आपले मंगळसूत्र पारड्यात टाकले. ( भविष्यकाळ)
(आ) तो आपली सर्व संपत्ती ह्या हारासाठी अर्पण करतो. ( भूतकाळ)
(इ) सैनिकांनी कवायत केली. ( वर्तमानकाळ)
(ई) आम्ही अजिंठ्याची लेणी पाहिली. ( भविष्यकाळ)

८. सुभाषबाबू इंग्रजांच्या पहाऱ्यातून भारताबाहेर कसे निसटून गेले, ही माहिती मिळवा व ती वर्गसभेत सांगा.

---

# २७. माझी आई - बहिणाई

माझी आई गव्हाळ्या रंगाची, मध्यम बांध्याची— थोडक्यात म्हणजे ती दहाजणींसारखी होती. तिचा आवाज अतिशय गोड होता. दळता दळता ओव्या गाऊ लागली म्हणजे जात्याच्या घरघरीबरोबर येणारे तिचे सूर सारं घर निनादून टाकत असत. आईच्या वयाची तिशी उलटण्याच्या आतच माझे वडील गेले. आईला अकाली वैधव्य आलं. त्या वेळी मी अवघा तीन वर्षांचा असेन-नसेन. माझ्या आईनं घरचा सर्व कारभार हिमतीनं चालवला.

शेता-शिवारांतील झाडांशी, वेलींशी तिची फार मैत्री होती. तिला आवडणाऱ्या झाडांना तिनं नावं दिली होती. आमच्या विहिरीच्या धावेवर एक गुलमोहर होता. त्याला ती म्हणत असे 'फुलाजीबोवा', 'फुलाजीमहाराज'.

मला एक प्रसंग आठवतो. आमच्या विहिरीला लागूनच पलीकडं माझ्या चुलतभावाची जमीन होती. आईच्या फुलाजीमहाराजांची सावली या जमिनीवर पडत असे. तो चुलतभाऊ एकदा संतापानं म्हणाला, "या झाडाच्या सावलीनं माझे भाजीचे चारपाच वाफे मरतात. हे झाड तोडून टाक."

आईच्या पोटात धस्स झालं. ती म्हणाली, "अरे, माझ्या राजा ! विहिरीमागचा आपला शेंदऱ्या आंबा समाईक आहे. त्याची सावली आमच्या मळ्यावर पडते. मग आंब्याचं झाडही तोडायचं का रे ? अरे, आंबे खाऊन पोट भरत असेल, पण या फुलाजीमहाराजाकडं पाहिलं की मन भरून जातं! "

यावर माझ्या चुलतभावाला काहीच बोलता आलं नाही.



दुर्दैवाची गोष्ट अशी, की पुढं काही वर्षांनी आमचे फुलाजीमहाराज वीज पडून जळून गेले. त्या दिवशी आई रात्रभर शोक करत बसली होती.

मृगाचा पाऊस आला, की आईचा आनंद गगनात मावत नसे. पावसाच्या सरींनी तिचं मन भरून जात असे. आषाढ-श्रावण आला म्हणजे तर विचारायलाच नको! श्रावणातील पाण्याच्या झडीबरोबर तिच्या गाण्याच्याही झडी सुरू होत. घरात कांडण करताना काय, धान्य पाखडताना काय किंवा दळताना काय, घरोट्यातून पिठी पडावी त्याप्रमाणं गाणं तिच्या ओठी येत असे —

अरे घरोटा घरोटा
तुझ्यातून पडे पिठी
तसं तसं माझं गाणं
पोटातून येतं ओठी

आईचं गाणं अगदी ताल धरून येत असे. आपण ज्या ओव्या गातो त्यात काव्य असतं याची तिला कल्पनाही नव्हती. कुणी तिचं कौतुक केलं तर ती म्हणायची, 'गाय दूध देते, त्याच्यात काय कवतिक ?'

निसर्गाशी आईचं जवळचं नातं होतं. आईबरोबर मी आजोळी पायीच जात असे. एकदा असं जात असताना रस्त्याच्या बाजूला एक शेवरीचं झाड उगवलेलं दिसलं. त्याची उंची कमरेइतकी होती. आई त्या शेवरीजवळ गेली आणि तिच्याशी काय बोलली कुणास ठाऊक!

त्यानंतर एकदोन वर्षांनी आईबरोबर मी आजोळी जायला निघालो. जाताना मध्येच ती थबकली आणि त्या शेवरीजवळ जाऊन मोठ्यांदा म्हणाली, "केवढी मोठ्ठी झाली ग तू!"

तिच्या माहेरच्या या वाटेत मध्येच एक लहानशी 'लौकी' नावाची नदी लागते. तिचे मूळ नाव 'लौकिका'. आई म्हणायची, 'लौके, तू रानावनातून, शेता-शिवारांतून वाहत आली. तुझं पानी कसं नित्तय. त्याले अम्रीनाची गोडी! गावाच्या नेट्टून वाहत गेली असती तर तू पस्तावली असती.'

आमच्या मळ्यात खिरणीचा एक वृक्ष होता. तो आईच्या अत्यंत आवडीचा. आई त्या खिरणीला 'दुभती' म्हणत असे. आमच्या वाड्यातील निंबाच्या झाडाला ती म्हणायची, 'निंबोजीबोवा'! एका वयवंत वडाच्या पारंब्या बघून ती म्हणायची, 'अरे बाप्पा, तू युगाचा उभा! पिढापिढीचा अन् लांब्या दाढीचा!' केळीच्या बागेतील घड आलेल्या केळीला म्हणत असे, 'लेकरं कडेवर घेऊन उभी. कशी माझी लेकुरवाळी रंभा!'

उतारवयात आई थकली. डोळ्यांना दिसेनासं झालं. परावलंबी जिणं तिला मान्य नव्हतं.

मी म्हणालो, "आई, तुझे मोतीबिंदू पिकले आहेत. ते आता काढले पाहिजेत. ऑपरेशन केलं पाहिजे."

आई कबूल झाली. मी तिला घेऊन मुंबईला आलो. ऑपरेशन यशस्वी झालं. डॉक्टरांनी डोळ्यांची पट्टी सोडली. डॉक्टर म्हणाले, "बाई, दिसतं का ?"

आई उद्गारली, "डाक्तर, तुम्ही गुलबकावलीची फुलं आणली!"

गुलबकावलीच्या फुलांचा हा उल्लेख ऐकून डॉक्टरांना तिचं खूप कौतुक वाटलं.

आईची साठी उलटल्यावर ती कथा-कीर्तनाला जात नसे. तिची पायदुखी हेही एक कारण होतं. मी तिला म्हणालो, "अलीकडं तू कथा-कीर्तनाला का जात नाहीस ?"

त्यावर ती म्हणाली, "नाही जात. अरे, तो कथेकरीबोवा 'नामा म्हने', 'तुका

म्हने तेच ते सांगतो. अरे पन भल्या मानसा, तू काय म्हने, ते एकदा तरी सांगशीन की नाही ?"

आई जळगावला माझ्या वडील भावाकडं राहत असे. वयाच्या सत्तरीत ती अतिशयच थकली. आजारी असल्याचं कळलं की उभ्याउभ्या तरी मी जाऊन येत असे.

असाच एकदा जळगावला गेलो. घरी आलो, तो वातावरण उदास! आई अत्यवस्थ होती. माझे वडील बंधू मला म्हणाले, "आत्ताच तुला पत्र धाडलं अन् इतक्यात कसा आलास ?"

समोरच बाजेवर आई होती. तिच्याजवळ मी बसलो. मी म्हणालो, "आई, मी औषधासारखा येतो, असं तू म्हणाली होतीस. मी आलोय. आता तू बरी होशील."

आई खिन्नपणं हसली आणि म्हणाली, "आता औसद ठिकानावर ! आगीनदेवाचं ! "

आईनं सांगितलेलं औषधच खरं होतं. आईचा शेवटचा श्वास केव्हा निघून गेला ते कळलंही नाही. तिच्याच शब्दांत सांगायचं म्हणजे —

आला सास, गेला सास,<br>
जीवा तुझं रे तंतर<br>
अरे जगनं-मरनं<br>
एका सासाचं अंतर !



**शब्दार्थ व टिपा :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**गव्हाळ** – निमगोरा. **वैधव्य** – नवरा वारल्यानंतरची स्त्रीची एकाकी अवस्था. **मृग** – खरिपाच्या सुरवातीस पडणाऱ्या पावसाचे एक नक्षत्र; हरण. **घरोटा** – जाते. **नित्तय** – नितळ. **पस्तावणे** – आपली चूक लक्षात येऊन वाईट वाटणे. **खिरणी** – निंबोळीसारखी फळे देणारे एक झाड. या फळात मधुर चीक असतो.

**वाक्प्रचार :**

**आनंद गगनात न मावणे** – अतिशय आनंद होणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. झाडाफुलांवर बहिणाईंचे प्रेम होते, याची दोन उदाहरणे सांगा.

२. मृगाचा पाऊस सुरू झाला, की आईचा आनंद गगनात मावत नसे असे का म्हटले आहे ?

३. बहिणाईंनी कथा-कीर्तन करणाऱ्यांबद्दल जे म्हटले आहे त्याचा अर्थ काय ?

४. डॉक्टरांनी गुलबकावलीची फुलं आणली असे बहिणाईंनी का म्हटले आहे ?

५. या पाठात आलेली झाडांची नावे आणि त्यांना बहिणाबाईंनी दिलेली नावे यांच्या जोड्या लावा व लिहा.

६. **व्याकरण :**

(क) खाली काही शब्द दिले आहेत. त्यांतील प्रत्येक शब्द जसाच्या तसा तीनदा वहीत लिहा.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| अजिबात | आणि | चटकन | धाडकन | मधूनमधून |
| अद्यापि | एकीकडे | जरूर | पण | यत्किंचित |
| अर्थात | कदाचित | तथापि | परंतु | यथाशक्ति |
| अलीकडे | कधीकधी | तुरुतुरु | पलीकडे | हळू |
| अवश्य | क्वचित | दुडुदुडु | बहुधा | हळूहळू |

(ख) पुढे काही शब्द दिले आहेत. ते खालील वाक्यांत योग्य त्या रिकाम्या जागी घाला आणि वाक्ये पूर्ण करा.

शब्द : हळूहळू, कदाचित, अवश्य, पलीकडे, तथापि.

वाक्ये : (अ) तुम्ही राजगड........पाहायला हवा.

(आ) तू येशील तेव्हा........मी घरी नसेन.

(इ) रस्ता खराब असल्यामुळे तो गाडी........चालवत होता.

(ई) नदीच्या पाण्याला ओढ होती,........आम्ही पोहत........गेलो.

(ग) 'क' मध्ये दिलेल्या बाकीच्या शब्दांचा उपयोग शिक्षकांच्या मदतीने करून वाक्ये तयार करा आणि ती लिहा.

७. या पाठात बहिणाईचे जात्यावरचे गाणे आले आहे. अशाच प्रकारची गाणी इतर काही कामे करतानाही म्हटली जातात. अशी गाणी वडीलधाऱ्या मंडळींच्या मदतीने मिळवा आणि त्यांचा संग्रह करा.

---

# २८. पतंग

हा पतंग, की पाखरू
म्हणे मज 'आभाळी चल फिरू.'



उंचावर किति वाकड्या
मारितो सारख्या उड्या
कुरणात जसे वासरू
शिवारी अवखळ की शिंगरू.

कितितरी चलाखी दिसे
तैशीच चढाई असे,
जणु दाखवितो की 'पहा
किती मी पराक्रमी, वाघरू!'

थरथरे दीपिकेपरी,
गिरगिरे नर्तिकिपरी,
की वारुवरून वायुच्या
बघे हा स्वार शिलंगण करू.



सरसरा चढे वरिवरी
एकेक काय पायरी.
सूर्यास पाहते धरू
काय हे अंजनिचे लेकरू.

**शब्दार्थ व टिपा:** ****************************
**वारू** - घोडा. **शिलंगण** - दसऱ्याच्या दिवशी गावाबाहेर सोने लुटायला जाणे, सीमोल्लंघन. **वाघरू** - वाघाचा बच्चा. **अंजनीचे लेकरू** - हनुमंत.

**प्रश्न व स्वाध्याय:**

१. पतंगाला पाखरू का म्हटले आहे ?
२. पतंग हा कोणाकोणाप्रमाणे अवखळ आहे ?
३. तो कशावर स्वार झाला आहे ? कशासाठी ?
४. पतंगाला वाघरू म्हटले आहे, ते का ?
५. पतंगाची तुलना हनुमंताशी कशासाठी केली आहे ?
६. 'लेकरू' म्हणजे मूल. या कवितेत काही प्राण्यांच्या पिलांसाठी शब्द आले आहेत. ते शोधून काढा.
७. रंगीबेरंगी पतंग तयार करा. तो उडवण्याचा आनंद घ्या.

# २९. आंब्याचा मोहर

शिशिरऋतू म्हटला की झाडांच्या पानांची गळनी डोळ्यांपुढे उभी राहते. काही अर्धीमुर्धी वाळलेली पाने फांद्यांच्या बोटांना धरून राहण्याचा प्रयत्न करतात; पण थोड्याच काळात ही पाने पोरकी होऊन घरंगळत खाली धुळीत येऊन पडतात. गुलमोहर, कडूनिंब, चिंच, वड यांची पानेतर सारखी भुरभुरत खाली पडताना दिसतात.

हिवाळा जसजसा वाढत जातो, तसतसा या झाडांचा मोहोर फुलतो, भरतो. शिशिरऋतूची ही जादू मोठ्या आणि ठळक प्रमाणात दिसते ती आंब्याच्या अंगावर!

मोहरलेल्या आंब्याचे दर्शन घ्यावे भल्या सकाळी! शिशिरऋतू हिरव्या पानांच्या बाबतीत कर्दनकाळ भासला तरी तो रंगांच्या बाबतीत मोठा रसिक कलावंत आहे. सकाळचे आणि संध्याकाळचे रंगकाम अति नाजूकपणे आणि विविध रीतीने करावे फक्त शिशिरऋतुनेच. भडक रंगकाम करण्यात शरद आणि हेमंत हे वाकबगार असले तरी रंगांच्या विविध नाजूक छटा दाखवण्यात शिशिरऋतू कुणालाही हार जाणार नाही.

सकाळी सूर्योदय व्हायच्या आधी पूर्वक्षितिजावर केशरी-कुसुंबी रंगाचा पट्टा पायथ्याशी गडद आणि आभाळात विरळ होत जातो. मग तो आभाळाच्या निळ्या रंगात मिसळून नाहीसा होतो. रंगाचा असाच पट्टा नेमका पश्चिम क्षितिजावरही दिसतो. रंगाच्या या खेळात शुक्र आपल्या मोत्याच्या शुभ्रतेची चमक दाखवत असतो. केशरी परिसर असलेल्या निळ्या आकाशावर ही चांदीची टिकली मोठी खुलून दिसते. तोच पूर्वक्षितिजावर सूर्याचा तांबडालाल गोळा येतो. तेव्हा या सर्वांचे स्वागत करायला हिरव्या सृष्टीतर्फे फक्त आंब्याचा मोहोरच काय तो पुढे होतो.

या आंब्याच्या मोहराने मनाला केवढातरी उल्हास वाटतो. मोहर आला म्हणजे आता वसंतपंचमी लवकरच येणार. गौराईची स्थापना होणार... म्हणजे खेळच खेळ! गौरीसाठी कोवळी-कोवळी आंब्याची पाने आणायची. तोपर्यंत

आंब्याला तांबूस कोवळी पालवी आलेली असतेच. त्या निमित्ताने आपल्या माहेरवाशीण बहिणीबरोबर आंबराईत जायचे, सूरपारंब्या खेळायच्या.

सूरपारंब्या हा खेळ खेळायला दोनच झाडे — एक वडाचे आणि दुसरे आंब्याचे. फांद्या जमिनीपासून फार उंच नसल्याने रिंगणातील काठी दूर भिरकावण्यासाठी उडी झटकन मारता येते आणि पटकन चढताही येते. आंब्याच्या फांद्या तशा मोठ्या सोईस्कर असतात. इतर झाडांना फांद्या फुटतात त्या खांद्यापासून पुढे. म्हणूनच पिंपळ, कवठ ही झाडे सूरपारंब्या खेळायला सोईची वाटत नाहीत आणि शिवाय झाडावर चढण्यातला आनंदही ती देऊ शकत नाहीत. नुसते सरसर वर चढत जायचे यात काय मजा ? आंब्याच्या झाडाच्या फांद्या गुडघ्यापासूनच फुटतात आणि सरळ उभ्या न जाता कधी समांतर तर कधी तिरकस अशा वाढत जातात. झाड चढण्यातही एक खेळ असतो, अल्लडपणा असतो, याचा अनुभव आंब्याचे झाड चढताना अधिक येतो. झाडावर चढायला शिकायचे असले तर आंब्याइतके दुसरे सोईस्कर झाड नाही. नारळीपोफळीसारखी झाडे नुसता मल्लखांब करायला लावतात; पण आंब्याच्या डेरेदार झाडाच्या सर्व भागांतून वानरासारख्या उड्या मारत मनसोक्त हुंदडता येते.



झाडावर चढण्यातील खराखुरा आनंद मिळतो तो मात्र पाडाला आलेल्या आंब्याच्या झाडावर चढण्याने!

सर्व फळझाडांत आपली जास्त मैत्री होते ती फक्त चिंच आणि आंबा या झाडांशीच. चिंचेचा कोवळा तांबूस पाला खाण्यापासूनच चिंचेशी मैत्री सुरू होते. पाल्यानंतर फुले, फुलांनंतर करंगळीच्या आकाराएवढ्या चिंचा, मग हिरवा चिंचोका असलेल्या चिंचा, गाभुळलेल्या चिंचा आणि शेवटी गुळाच्या रंगासारख्या चिंचा खाता खाता माघ महिना येऊन ठेपतो.

आधीच्या पौष महिन्यातील थंडीने आंब्याला जाग आलेली असते. मळकटलेल्या हिरव्या पानांतून पिवळसर हिरवे घोस डोके वर काढतात. तांबूस होत जातात. मधला देठ तर चांगलाच लाल होतो. या मधल्या देठाला फांद्या फुटलेल्या असतात आणि फांद्यांना तिळाच्या आकाराएवढी गोल फुले लगडतात. या पिवळसर शुभ्र फुलांना हळूहळू तांबूस छटा येते आणि या तांबूस छटेबरोबरच काहीसा उग्र मातकट वास दरवळू लागतो. झाडांपासून थोड्या अंतरावर येताच मोहोराचा वास जाणवतो आणि काकडून टाकणाऱ्या थंडीतही मन मोहरते.

हळूहळू होळीचे दिवस येतात आणि मोहोराची फुले झडून त्या जागी सुपारीच्या आकाराच्या हिरव्या गोट्या दिसतात. मग फक्त मोहोराच्या फांद्यांचे फराटे तेवढे राहतात. या प्रत्येक फराट्याला चारचार, पाचपाच कैऱ्या लोंबत असतात.

एकदा का आंबा पाडाला आला, की झाडावर चढून रसाने भरलेला आंबा शोधून काढण्यात खरी मजा येते. या कामात पाखरांची चांगलीच मदत होते. आपल्या अगोदर कैरी पिकल्याचा सुगावा त्यांना लागलेला असतो. आपल्या चोचींनी त्या कैऱ्यांचा आस्वाद ती पाखरेच अगोदर घेतात.

आणि मग एके दिवशी आंबा उतरवण्याचा बेत ठरतो. चांगले शेंड्यापर्यंत चढणारे गडी बोलावले जातात. गडी वर चढले, की अगोदर पाड शोधतात. एखाददुसरा खाली टाकतात; पण जसजसे ऊन चढते तसतसे झोळणे भरभरून खाली येतात. कैऱ्यांनी खाली वाकलेल्या फांद्या पुन्हा ताठ होतात.

तिसऱ्या प्रहरापर्यंत केवढा ढीग जमतो!

आंबा उतरून झाला म्हणजे मला हुरहूर लागते. दोनतीन महिन्यांच्या काळात आंब्याच्या झाडाचा खूपच लळा लागलेला असतो. आता यापुढे वर्षाऋतूत वनदेवी खूप नटणार असते; पण तरीही मला आंब्याच्या झाडाची आठवण एकसारखी होतच राहते.

**शब्दार्थ व टिपा** : ******************************

**पोरकी** – आईबाप नसलेली – कसला आधार नसलेली – परदेशी. **वाकबगार** – कुशल, कसबी. **कर्दनकाळ** - प्रत्यक्ष यमासारखा; क्रूर, निष्ठूर. **सुगावा** - शोध, तपास. **आस्वाद** - चव. **केशरी-कुसुंबी**- केशराच्या रंगाचा. **गौराई** - पार्वती.

**प्रश्न व स्वाध्याय** :

१. रसिक कलावंत कोणाला म्हटले आहे ? का ?

२. आंब्याच्या मोहराने लेखकाला उल्हास का वाटतो ?

३. सूरपारंब्या खेळायला कोणती झाडे योग्य असतात ? का ?

४. आंबा आणि चिंच या झाडांशीच आपली मैत्री जास्त का होते ?

५. मोहर आल्यापासून कैऱ्या पाडाला येईपर्यंत आंब्याच्या झाडात काय काय बदल होतात ?

६. लेखकाला आंब्याच्या झाडाची आठवण एकसारखी का होत राहते ?

७. **व्याकरण** :

१. खालील वाक्ये वाचा.

(अ) निळ्या आकाश**ावर** ही चांदीची टिकली मोठी खुलून दिसते.

(आ) **गौरीसाठी** आंब्याची पाने आणायची.

(इ) आंब्याच्या फांद्या जमिनी**पासून** फार उंच नसतात.

(ई) काकडून टाकणाऱ्या थंडीत**ही** मन मोहरते.

(उ) शेंड्या**पर्यंत** चढणारे गडी बोलावले जातात.

(ऊ) भाकरी बांधून आंबराई**कडे** सारेजण कूच करतात.

वरील वाक्यांत जाड अक्षरांत छापलेले पुढील शब्द पाहा - वर, साठी, पासून, ही (सुद्धा), पर्यंत, कडे.

२. पुढे काही शब्द दिले आहेत. ते त्याखालील वाक्यांत योग्य त्या रिकाम्या जागी घालून वाक्ये पूर्ण करा आणि ती लिहा.

शब्द : करिता, पुढे, पैकी, पेक्षा, च, मुळे.

वाक्ये :

(अ) जमलेल्या सर्व लोकां........उभे राहून मी भाषण केले.

(आ) आजारपणा.........तिला सामन्यात भाग घेता आला नाही.

(इ) अनेकांनी देशा........प्राण अर्पण केले.

(ई) माझ्या बहिणीला चित्रपटा........नाटक आवडते.

(उ) हे काम तू........करू शकशील.

(ऊ) त्याला गणितात शंभरा........शंभर गुण मिळाले.

३. पुढे दिलेले शब्दही त्यांच्या मागील शब्दांना जोडून येतात. त्यांचा उपयोग करून वाक्ये करा.

पूर्वी, मागे, खेरीज, पण (सुद्धा या अर्थाने), संबंधी.

८. डेरेदार आंब्याच्या झाडाचे चित्र काढा.

# ३०. एक अपघात



पेपर उघडून मी बातम्या वाचू लागलो. इतक्यात माझा मित्र म्हणाला, "अरे, वर्ध्याची बातमी वाचलीस का ?"

त्यानं दाखवलेली बातमी मी वाचू लागलो. 'अपघात' हा जाड ठशातला शब्द दिसताच मी क्षणभर बावरलो. कुणाला अपघात झाला असावा ?

फुटबॉल खेळता खेळता शंकरराव देव पडले होते आणि त्यांच्या पायाचं हाड थोडंसं दुखावलं होतं.

शंकरराव देव म्हणजे महाराष्ट्राचे एक मोठे नेते. गांधीजींचे शिष्य. देशासाठी त्यांनी आपल्याला वाहून घेतलेलं. एकदा तर तुरुंगात त्यांनी फटक्यांची शिक्षाही भोगलेली. अशा थोर देशभक्ताला खेळताना अपघात झाला होता!

मी ती बातमी पुन्हा मोठ्या कौतुकानं वाचू लागलो. तेव्हा माझा मित्र हसून म्हणाला, "युद्धाच्या बातम्यांपेक्षाही या बातमीत तू अधिक रंगून गेलेला दिसतोयस!"

"हूं!" मी उत्तर दिलं.

"असं काय आहे त्यात?"

त्याचं बोलणं आणि हसणं थांबेपर्यंत मी गंभीरपणं गप्प बसलो.

मग मी हळूच म्हणालो, "ही बातमी वाचून फार आनंद झाला मला!"

"आनंद! अपघातात आनंद कसला! शंकरराव देव पडले म्हणून लहान पोरासारखा आनंद झाला होय तुला?"

"तसं नव्हे रे! मोठ्या व्यक्तीसुद्धा आपल्यासारखीच माणसं असतात, हे मनात येऊन आनंद झाला मला! थोर माणसं आपल्याला आवडतात याचं कारण ती आपल्यापेक्षा फार मोठी असतात म्हणून नव्हे; ती तुझ्या-माझ्याप्रमाणंच हसतात, खेळतात नि प्रसंगी आपल्यासारखीच पडतात-देखील म्हणून."

काही केल्या वाचनात माझं लक्ष लागेना. राहून राहून शंकरराव देव आणि फुटबॉल यांची आठवण होत होती मला. या अपघातासंबंधी वेगवेगळ्या वर्तमानपत्रांत पहिल्या पानावर काय काय छापून येईल, याची मी कल्पना करू लागलो.

माझ्या मनात आलं, शंकरराव देव मोठे देशभक्त आहेत हे तर खरंच, पण ते मुलांमध्ये मूल होऊन मिसळतात, खेळतात म्हणूनही ते मोठे आहेत. मनुष्य जितका अधिक मोठा, तेवढा त्याचा चेहरा अधिक गंभीर असला पाहिजे, असं

मानणारी अनेक माणसं आढळतात. जवाहरलाल नेहरू पत्ते खेळतात अगर सुभाषबाबू लॉरेल-हार्डीचा चित्रपट पाहून खो खो हसतात, असं जर कुणी सांगितलं तर काहीतरी विचित्र घडल्यासारखे त्यांचे चेहरे गंभीर होतात!

जपानमध्ये म्हातारी माणसं मोठ्या हौसेनं पतंग उडवत असतात, असं एका इंग्रजी पुस्तकात एक वाक्य आहे. मी ते शिकवत असताना वर्गात जो विलक्षण हशा उसळला होता तो अजूनही मला आठवतो. वर्गातल्या प्रत्येक मुलाचं हास्य जणू म्हणत होतं – म्हातारी माणसं पतंग उडवतात? छे! लहान मुलानं आजोबांचा चष्मा लावावा, त्यातलाच प्रकार आहे हा! उद्या म्हातारी माणसं लंगडीही खेळतील, म्हाताऱ्या बायका फुगड्या घालू लागतील आणि डोक्याला टक्कल पडलेले किंवा पाठीला पोक आलेले लोक 'हुतुतूतू' करीत एकमेकांना मारण्याचा प्रयत्न करतील! किती हास्यास्पद आहे हे!

जपान हे जगातले एक प्रमुख राष्ट्र आहे, याचं कारण तिथं म्हातारी माणसं लहान मुलांसारखी पतंग उडवतात, असं मी त्या वेळी बोलून गेलो. वाक्य तोंडातून गेल्यावर मग मला वाटलं, मुलांच्या हसण्याला उत्तर म्हणून आपण भलतंच बोललो; पण आता वाटतं, माझं ते बोलणं बरोबरच होतं.

वर्तमानपत्रातल्या त्या बातमीवर माझी दृष्टी पुन्हा स्थिर झाली. त्या बातमीतली 'अपघात' ही अक्षरं माझ्या डोळ्यांत कशी खुपू लागली! माझ्या मनात आलं, ह्या वर्तमानपत्राचे संपादक अरसिकच आहेत! शंकरराव फुटबॉल खेळताना चुकून पडले असतील, त्यांच्या पायाचं हाड थोडंसं दुखावलंही असेल. म्हणून काय या बातमीचा मथळा 'श्री. शंकरराव देवांना अपघात' असा छापायचा?

छे! मी जर या वर्तमानपत्राचा संपादक असतो, तर या बातमीचा मथळा मोठ्या ठशात छापला असता; पण तो 'श्री. शंकरराव देवांना अपघात' असा नाही, तर 'श्री. शंकरराव देवांचं अभिनंदन' असा!



**शब्दार्थ व टिपा :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**हास्यास्पद** – ज्याचे हसे होते असे. **डोळ्यांत खुपणे** – न आवडणे, सहन न होणे. **अरसिक** – सौंदर्य आणि मर्म न समजू शकणारा.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. शंकरराव देवांच्या अपघाताची बातमी लेखक कौतुकाने पुन्हा का वाचू लागला ?

२. शंकररावांना अपघात झाल्याची बातमी वाचून लेखकाला आनंद कशामुळे झाला ?

३. थोर माणसांविषयी आपल्या काय काय कल्पना असतात ?

४. लेखकाला मोठ्या माणसांचा कोणता गुण महत्त्वाचा वाटतो ?

५. अपघाताची ती बातमी लेखकाने कशी दिली असती ? का ?

६. छे ! ' हा शब्द एखादी गोष्ट नापसंत आहे असे दाखवण्यासाठी आपण वापरतो. खालील शब्द काय दाखवण्यासाठी वापरले जातात ते सांगा आणि त्यांचा तुमच्या वाक्यांत उपयोग करा.

अबब ! , अरेरे ! , शी: ! , वा !

७. **व्याकरण :**

पुढील संभाषण वाचा.

मी म्हणालो, "ही बातमी वाचून फार आनंद झाला मला."

"आनंद ! अपघातात आनंद कसला ! शंकरराव देव पडले म्हणून आनंद झाला होय तुला ?"

अशा संभाषणाचे लेखन करताना दुहेरी अवतरण चिन्हांचा ("     ") उपयोग करतात.

पुढील वाक्ये वाचा.

(१) या बातमीतली 'अपघात' ही अक्षरं माझ्या डोळ्यांत खुपू लागली.

(२) 'रामायण' हा ग्रंथ वाल्मीकीने लिहिला.

(३) शिक्षक म्हणाले, "मुलांनो, 'एकी हेच बळ' ही म्हण तुम्हांला माहीत आहे ना ?"

(४) 'राम', 'झाड', 'नदी' ही नामे आहेत.

या वाक्यांत एकेरी अवतरणचिन्हे वापरली आहेत. एकेरी अवतरणचिन्ह केव्हा वापरतात ?

(१) दुसऱ्याच्या तोंडचे किंवा लेखनातील शब्द अथवा वाक्ये जशीच्या तशी देताना;

(२) एखादी म्हण किंवा सुभाषित लिहिताना;

(३) पुस्तक, संस्था, इमारत, उद्यान, रस्ता इत्यादींचे नाव लिहिताना;

(४) व एखादया विशेष शब्दाकडे लक्ष वेधताना.

खालील वाक्यांत जरूर तेथे योग्य ती अवतरणचिन्हे वापरा.

(अ) मित्र म्हणाला, वर्ध्याची बातमी वाचलीस का ?

(आ) त्या मथळ्यातील भारताचा विजय या शब्दांनी मला फार आनंद झाला.

(इ) असं काय आहे त्यात ? मित्राने विचारले.

(ई) सुभाषचद्रांनी आझाद हिंद-सेना स्थापन केली.

(उ) इसापनीती हे पुस्तक मला फार आवडते.

(ऊ) कष्टेवीण फळ नाहीं हे रामदासांचे वचन फळ्यावर लिहा.

८. तुमच्या घरातील मोठी माणसे कधीकधी तुमच्या खेळात सामील होतात. तेव्हा तुम्हांला काय वाटते ते लिहा.

---

# ३१. एक आगळी जत्रा

मे महिन्याच्या सुटीत जत्रेसाठी मामाचं बोलावणं आलं. त्यानं पत्रात लिहिलं होतं – 'नारबा, ही जत्रा नेहमीच्या जत्रेसारखी नाही बरं का. वेगळीच जत्रा आहे ही. तिचं नाव आहे– 'विज्ञानजत्रा'. ती पाहून तुला खूप गंमत तर वाटेलच, शिवाय बरंच काही शिकताही येईल.'

'विज्ञानजत्रा' या नावाबद्दल मला कुतूहल वाटू लागलं आणि मी दुसऱ्याच दिवशी सकाळी एस.टी.नं जांभूळगावला गेलो.

जत्रा शाळेच्या पटांगणात भरली होती. आम्ही गेलो तो तिथं पटांगणात उभारलेला मोठा तंबू दिसला. जवळ गेलो तसं त्याचं प्रवेशद्वार डोळ्यापुढं उभं राहिलं. त्या प्रवेशद्वारांवर लावलेल्या कापडी फलकावरची ठळक सोनेरी अक्षरं लांबूनही दिसत होती – 'विज्ञानजत्रा'.

जत्रा पाहायला लोकांची खूप गर्दी होती. आम्ही आत गेलो. एका दालनावर पाटी लावली होती – 'सूर्यशेगडी'. ते नाव वाचून मी बुचकळ्यातच पडलो. कोळशाची शेगडी, भुशाची शेगडी मी पाहिली होती; पण सूर्यशेगडी मी ऐकलीही नव्हती. ती कशी असेल म्हणून मी इतरांबरोबर पुढं झालो.




एका लोखंडी तिपाईवर एक वाटोळा तुकडा ठेवलेला दिसत होता. तिथं असलेली एक स्वयंसेविका माहिती सांगू लागली, "हा सिमेंट ॲस्बेस्टॉसचा आंतरवक्र तुकडा तिपाईवर बसवला आहे. त्यावर अनेक छोटे आरसे गोलाकार लावलेले तुम्हांला दिसून येतील. त्या आरशांच्या वरच्या बाजूस भांडं ठेवता येईल अशी रचना केली आहे."

आम्ही जवळ जाऊन ते सर्व बारकाईनं पाहिलं.

स्वयंसेविका पुढं म्हणाली, "हिचं नाव 'सूर्यशेगडी'. आता मी काय करते ते नीट बघा हं."

मग तिनं तंबूच्या वरच्या भागात असलेली कापडी खिडकी उघडली. खिडकीतून सूर्यकिरण आत झेपावले. शेगडीतले आरसे त्या किरणांशी काटकोन करून राहतील अशी तिनं जुळणी केली. मग तिनं त्या शेगडीवर एक भांडं ठेवलं. आरशांनी परावर्तित केलेले सर्व सूर्यकिरण खालच्या बाजूस एकत्रित झाले होते. थोड्या वेळानं भांड्यातील पाणी गरम झालं.

स्वयंसेविका पुढं म्हणाली, "वेगळ्या आकाराच्या सूर्यचुलीत आता शिजवणे, भाजणे, उकडणे या क्रिया करता येतात. अगदी केक, नानकटाईसुद्धा."

ते ऐकून माझी मामी म्हणाली, "काय छान होईल हो मग! असली एक शेगडी घेतली, की चूल फुंकून धुरानं डोळे जायला नकोत!"

एवढ्यात मामाही आमच्या गटात येऊन मिसळला. तो सर्वांना सांगू

लागला,"लाकूड, कोळसा, रॉकेल हे सगळं हळूहळू संपत चाललं आहे. तेव्हा सूर्यशेगडीचा वापर करता आला तर छानच होईल! दिल्लीच्या एका मोठ्या हॉटेलात सूर्यशेगडी आहे.तिच्यावर त्या हॉटेलला लागणारं पाणी तापवलं जातं."

मामीनं एक शंका विचारली, "अहो, पण पावसाळ्यात जेव्हा सूर्यदर्शनही होत नसतं तेव्हा ही शेगडी वापरणार कशी ?"

त्यावर मामा म्हणाला, "सूर्यापासून मिळालेली उष्णता साठवून ठेवता येते. ती उपयोगातही आणता येते; पण ते फार खर्चाचं काम आहे. हा खर्च कमी कसा करता येईल, या बाबतीत वैज्ञानिक प्रयोग करत आहेत."

मग आम्ही पुढं निघालो. पुढच्या दालनावर एक फलक होता–

'तुमचे पाणी'.

पाण्यासंबंधी माहिती देणाऱ्या प्रतिकृती, चित्रं व तक्ते त्या दालनात होते. माझं लक्ष वेधलं ते तिथल्या डोंगराच्या एका प्रतिकृतीनं. डोंगराच्या उतारावर वस्ती होती. त्या वस्तीवर दोन विहिरी दाखवलेल्या होत्या. एका विहिरीजवळ एक माणूस उभा राहिला होता. तो घागरी घेऊन आलेल्या काही लोकांना सांगत होता, 'तुम्हांला मी या विहिरीवर पाणी भरू देणार नाही. तुम्ही दुसऱ्या विहिरीवर पाणी भरा.

खरं तर, दोन्ही विहिरींना जमिनीच्या पोटातून मिळणारं पाणी एकच दिसत होतं. ते दाखवून स्वयंसेवक सांगू लागला, "जमिनीच्या पोटातलं सगळं पाणी एकच असतं. आपण जमिनीवरची माणसं मात्र आपापसांत भेद करतो आणि विनाकारण भांडतो. आपलं हे वागणं किती वेडेपणाचं आहे! आता लक्षात ठेवा, गावची विहीर ही सर्वांची."

जत्रेच्या पुढच्या दालनात लोकांची खूपच गर्दी झाली होती. तिथं एक दाढीमिशावाला बुवा उभा होता. त्यानं आपला उजवा तळहात वर करून लोकांना दाखवला. हातात काहीही दिसत नव्हतं. मग त्यानं त्या हाताची मूठ करून समोरच्या एका माणसाच्या तळहातावर उघडली. त्याबरोबर त्या माणसाच्या तळहातावर भस्म पडलं. हा प्रयोग त्यानं दोन-तीनदा करून दाखवला. मग त्यानं आपल्या डोक्यावरच्या जटेतून कारंज्यासारख्या

पाण्याचा फवारा उडवून दाखवला.

लोकांना वाटलं, गंगाच प्रकट झाली.

त्यांच्या आश्चर्याला सीमाच उरली नाही. हा कोण थोर साधूच आपल्या गावात आला आहे, असं वाटून काहींनी त्याला आदरानं हात जोडले.

त्याबरोबर बुवा हसू लागला. मग तो म्हणाला, "असं आश्चर्यचकित होऊ नका आणि मला नमस्कारही करू नका. मी इथल्या विज्ञानजत्रेचाच एक स्वयंसेवक आहे. मी आता तुम्हांला जे काही करून दाखवलं, त्यात कसलाही दैवी चमत्कार नाही. थोडंसं चातुर्य, थोडीशी हातचलाखी शिकलात, तर तुम्हांलासुद्धा ते करून दाखवता येईल."

मग त्यानं त्या प्रयोगातील हातचलाखीची माहिती लोकांना करून दिली. त्यानं आपल्या भगव्या कफनीचा मनगटाच्याही पुढं आलेला उजवा हातोपा वर सारून तो हात लोकांपुढं धरला. कोपराखाली हाताच्या आतल्या बाजूस



बांधलेली एक रबरी पिशवी आणि तिची तळहातापर्यंत पोचलेली नळी लोकांना दिसून आली.

बुवा बनलेला तो स्वयंसेवक म्हणाला, "माझ्या हातोप्याच्या आत दडवलेली ही रबरी पिशवी तुम्हांला दिसली नाही. तिच्यात मी राख भरून

ठेवली आहे. तुमच्या तळहातावर मी जेव्हा माझी बंद मूठ उघडली तेव्हा मी या हाताची आतली बाजू माझ्या पोटावर दाबली. त्याबरोबर रबरी पिशवीवर दाब पडला. नळीवाटे राख बाहेर आली आणि ती तुमच्या हातावर पडली. तुम्हांला वाटलं, मी रिकाम्या हातातून भस्म काढलं."

मग त्यानं आपल्या डोक्यावरची केसांची जटा सोडली. केसांत पाण्यानं भरलेली आणखी एक रबरी पिशवी होती.

ती पाहताच लोक हसू लागले आणि बघता बघता आपण कसे चकवले गेलो हे त्यांना कळून आलं.

तो स्वयंसेवक पुढे म्हणाला, "तुम्ही असा अंधविश्वास ठेवता म्हणूनच बाबा-बुवांचं फावतं. ते तुम्हांला हातोहात फसवून लुबाडतात. तेव्हा असे आंधळे बनू नका. प्रत्येक गोष्ट का व कशी घडते याचा छडा लावायला शिका. विज्ञान हेच आपल्याला शिकवतं. ते आपण जितक्या लवकर शिकू, तितके आपण सुखी होऊ."

अशी ही आगळी जत्रा पाहून कितीतरी नव्या गोष्टी मला कळल्या. जत्रा संपली; पण जे पाहिलं ते कायमचं मनावर ठसलं.

**शब्दार्थ व टिपा :** ******************************

**तिपाई** – तीन पायांची घडवंची. **आंतरवक्र** – आतल्या बाजूने गोलाकार असलेले.
**हातोपा** – बाही.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. नेहमीच्या जत्रेपेक्षा ही जत्रा वेगळी का वाटते ?
२. सूर्यशेगडीबद्दल मामी काय म्हणाल्या ?
३. 'गावची विहीर ही सर्वांची' हे स्वयंसेवकाने कसे पटवून दिले ?
४. आपल्या गावात कोणी साधू आला आहे, असे लोकांना का वाटले ?
५. आपल्या प्रयोगातील चातुर्याची माहिती करून देण्यात बुवाचे सोंग घेतलेल्या स्वयंसेवकाचा कोणता हेतू होता ?
६. सुखी होण्यासाठी आपण काय केले पाहिजे ?
७. खालील शब्दांचा व शब्दसमूहांचा तुमच्या वाक्यांत उपयोग करा.
प्रतिकृती, हातचलाखी, हातोहात, बुचकळ्यात पडणे, सीमा न उरणे, छडा लावणे.

८. **व्याकरण :**
या पाठाचा पहिला परिच्छेद वाचा आणि त्यातील शब्दांचे प्रकार पुढीलप्रमाणे तक्ता करून त्यात भरा.

| नाम | सर्वनाम | क्रियापद | काळ |
| --- | --- | --- | --- |

९. 'देवी' हा रोग देवीच्या रागामुळे होतो अशी पूर्वी समजूत होती. विज्ञानाने ही समजूत कशी चुकीची होती, हे दाखवून दिले आहे. विज्ञानाने खोट्या ठरवलेल्या अशा आणखी कोणकोणत्या समजुती पूर्वी होत्या, याची माहिती मिळवा.

# ३२. संतवाणी

## (१) जनाबाई

पक्षी जाय दिगंतरा । बाळकांसी आणी चारा ॥ १ ॥
घार हिंडते आकाशीं । झाप घाली पिल्लांपासी ॥ २ ॥
माता गुंतली कामासी । चित्त तिचें बाळापार्शी ॥ ३ ॥
वानर हिंडे झाडावरी । पिलीं बांधुनी उदरीं ॥४ ॥
तैसा आम्हांसी विठ्ठलमाये । जनी वेळोवेळां पाहे ॥ ५ ॥

## (२) एकनाथ

म्हणती देव मोठे मोठे । पूजिताती दगडगोटे ॥ १ ॥
कष्ट नेणती भोगिती । वहा दगडातें म्हणती ॥ २ ॥
जीत जीवा करूनि वध । दगडा दाविती नैवेद्य ॥ ३ ॥
देव म्हणती मेसाबाई । पूजाअर्चा करिती पाही ॥ ४ ॥
नैवेद्य वहाती नारळ । अवघा करिती गोंधळ ॥ ५ ॥
बळेंचि मेंढरें बोकड मारिती । सुकी रोटी तया म्हणती ॥ ६ ॥
बळेंचि आणिताती अंगा । नाचताती शिमगी सोंगा ॥ ७ ॥
एका जनार्दनीं ऐसा देव । येथें कैचा आमुचा भाव ॥ ८ ॥

## (३) तुकाराम

हिरा ठेवितां ऐरणीं। वांचे मारितां जो घणीं ॥ १ ॥
तोचि मोल पावे खरा। करणीचा होय चुरा॥ २ ॥
मोहरा होय तोचि अंगें। सुत न जळे ज्याचे संगें ॥ ३ ॥
तुका म्हणे तोचि संत। सोसी जगाचे आघात ॥ ४ ॥



**शब्दार्थ व टिपा :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**दिगंतरा** – दुसरी दिशा. **झाप घाली** – वेगाने खाली उतरते. **नेणणे** – न जाणणे. **भोगिती** – नाना सुखांचा अनुभव घेण्याची धडपड करतात, सुखाच्या मागे लागतात. **मेसाबाई** – एक देवता. ती स्वत:साठी लक्ष कोटी जीव मारते, अशी तिच्याविषयी समजूत आहे. **एका जनार्दनी** – या नावाने एकनाथ स्वत:चा उल्लेख करतात. 'एका' म्हणजे एकनाथ. जनार्दनस्वामी नावाचे एकनाथांचे गुरू होते. त्यांचा उल्लेख स्वत:च्या नावापुढे एकनाथांनी सर्वत्र आदराने केला आहे. **भाव** – भक्ती. **ऐरण** – ज्यावर ठोकून अलंकार, भांडी वगैरे घडवली जातात तो लोखंडी ठोकळा. **घण** – छड;मोठा हातोडा. **मोल पावे** - किंमत येते. **करणी** – कृत्रिम मणी; काच. **मोहरा** – ज्याच्या संगतीत आगीतही सूत जळत नाही असे रत्न.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. जनाबाईनी आपल्या अभंगात कोणकोणती उदाहरणे दिली आहेत ? कशासाठी ?
२. लोकांचे कोणते वर्तन एकनाथांना नापसंत आहे ?
३. कोणत्या देवावर आपली भक्ती नाही, असे त्यांनी म्हटले आहे ?
४. संत कोणास म्हणावे असे तुकारामांना वाटते ? त्यासाठी त्यांनी कोणती उदाहरणे दिली आहेत ?
५. (अ) 'वेळोवेळा' म्हणजे प्रत्येक वेळेला. खालील शब्दांपासून असे नवे शब्द तयार करा.
   गाव, रस्ता, गल्ली, घर, पाऊल.

   (आ) 'दगडगोटे' – 'दगड' या शब्दापुढे त्याच अर्थाचा 'गोटे' हा शब्द घेऊन 'दगडगोटे' हा शब्द तयार झाला आहे.

खालीलपैकी प्रत्येक शब्दापुढे त्याच अर्थाचा दुसरा शब्द घालून अशा प्रकारचे शब्द तयार करा.
बाजार, भाजी, केर, पाला, चूक.

(इ) खालीलपैकी एखादे चित्र वहीवर काढा.

१. पिलाच्या चोचीत चारा घालणारी पक्षीण.
२. घिरट्या घालणारी घार.

---

# ३३. जावईबुवांची गोष्ट

अनायासे गावात नाटक होणार होते. ते पाहायला जावईबुवांना बोलावले तर त्यांचे कौतुक केल्यासारखे होईल, असा विचार करून स्वतः सासरे त्यांना निमंत्रण दयायला गेले. गप्पाटप्पा झाल्यावर सासरे म्हणाले, "जावईबुवा, आम्ही मुद्दाम आज तुम्हांला नाटकाचं निमंत्रण दयायला आलोय. आमचं नाटक बघायला सगळ्यांनी यायचं. उदया रात्रीच आहे."

जावईबुवा म्हणाले, "नाटक ? कसलं नाटक ?"

"नाटक हो, आपलं पौराणिक."

"म्हणजे ते काय असतं ?"

"म्हणजे काय बरं का..." असे म्हणून सासरे समजावून सांगू लागले, "कुठली तरी एक गोष्ट घ्यायची आणि ती सगळ्यांसमोर करून दाखवयाची. निरनिराळी माणसं त्यात निरनिराळी कामं करतात. फार मजा असते. या आपण पाहायला."

"कसली गोष्ट असते ?"

"कसलीही असते. आता उदया 'कीचकवध' करून दाखवणार आहेत."

जावईबुवा आश्चर्याने म्हणाले "बाप रे! कीचकवध! म्हणजे ठार मारून दाखवणार कीचकाला ?"

"खरं ठार मारून नाही दाखवत. आपलं नाटकातलं."

"हं:! मग कीचकवध कसला आलाय तो ? खोटा कीचकवध झाला तो!"

जावईबुवांनी नापसंती दाखवली.

"आपल्याला खोट्या गोष्टी नाही बुवा आवडत. खरंखुरं पाहिजे. खरा वध दाखवणार असलात तर येतो पहायला."

सासऱ्यांना वाटले, की जावईबुवा थट्टाच करताहेत. म्हणून त्यांनी आश्वासन दिले. खरा कीचकवध दाखवू म्हणून कबूल केले. जावईबुवांना मजा वाटली. त्यांनीही यायचे मान्य केले.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी दोन बैलगाड्या वाड्यासमोर उभ्या राहिल्या. एका गाडीत बायका. एका गाडीत पुरुष. सगळ्यांची तयारी झाली. गाडीत बसता बसता जावईबुवांच्या हातातल्या जाड काठीकडे सगळ्यांचे लक्ष गेले. मेव्हणा म्हणाला, "हे काय भाऊजी, हातात ?""

"ही-ही काठी आहे."

"ते झालं हो. पण कशासाठी ?"

"तो कीचकवध आहे ना, म्हणून."

"म्हणजे ?" मेव्हणा घाबरला.

"त्या कीचकाचा वध करायचा आहे ना ? समजा, ऐन वेळेला नाही झाला भीमाच्या हातनं, तर मी आपला आहेच! एक काठी कीचकाच्या टाळक्यात घालायची की खलास! एका टोल्यात काम होईल."

"अंहंहं! तसं काही करायचं नसतं हं नाटकात. आपण नुसतं नाटक बघायचं असतं."

"वा! तिकडं मारामारी होणार अन् आपण गप्प बसायचं ? भलतंच!"

आता जावईबुवा इथंच हट्ट धरून बसताहेत की काय, अशी भीती सगळ्यांना वाटू लागली. शेवटी सासऱ्याने समजावून सांगितले आणि मग जावईबुवांनी नाइलाजाने काठी टाकून दिली.

गाड्या निघाल्या. सगळी मंडळी मारुतीच्या देवळासमोर उभारलेल्या तात्पुरत्या थिएटरकडे गेली. थोड्या वेळाने नाटक सुरू झाले.

नाटक पाहत असताना सासरे आणि मेहुणा दोघेही जावईबुवांना मध्ये घेऊन हुशारीने बसले होते. तरीपण नाटक जसजसे रंगात येऊ लागले

तसतसे जावईबुवा एकसारखे उसळ्या मारू लागले. बल्लवाच्या पाकघरातील गमती पाहताना त्यांना भयंकर हसू आले. इतके की दोनतीनदा ते खोखो करून मोठ्यांदा हसले. त्यामुळे लोक त्यांच्याकडे वळून वळून बघू लागले. धर्मराजाचे शांत बोलणे ऐकून त्यांना भारी चीड आली. कीचकाचे काम करणारा नटही बावचळून त्यांच्याकडे पाहायला लागला. तेव्हा जावईबुवांनी हाताचा गुद्दा करून त्याला ठोसे मारल्याचा अभिनय करून दाखवला. सासऱ्यांनी त्यांना पुन्हा खाली बसवले. पुन्हा नाटक सुरू झाले.

अगदी शेवटी मात्र जावईबुवांनी कमाल केली.

शेवटच्या प्रवेशात भीम आणि कीचक यांचे मल्लयुद्ध होते. जोराची मारामारी होते आणि कीचक मरतो तो प्रवेश सुरू झाला, तसे जावईबुवा अस्वस्थ झाले. कुस्ती सुरू झाल्यावर तर त्यांना अजिबात राहवेना. एकदा भीम कीचकाच्या उरावर बसला. मग कीचक भीमाच्या छातीवर बसला. झटापट सुरू झाली. जावईबुवांचा चेहरा फारच चिंताक्रांत झाला. ते सासऱ्याला म्हणाले, "आता या भीमाचं कसं होईल हो ? एखादया वेळेस कीचक त्याला ठार मारील ना!"

सासरे त्यांना खाली बसवण्याचा प्रयत्न करत म्हणाले, "तसं होत नसतं. भीमच मारणार कीचकाला. तुम्ही नुसतं पहा म्हणजे झालं."

"काय सांगताय काय ? तो बघा भीम गेला पुन्हा खाली. आता तो कसला वर येतोय ? आपण सगळ्यांनी त्याला मदत केली पाहिजे."

"छे हो, भलतंच काहीतरी. तुम्ही बसा खाली."

पण जावईबुवांचे तिकडे लक्षच नव्हते. ताठ उभे राहून ते भीमाला तिथूनच सूचना देऊ लागले; पण भीमाचे काही तिकडे लक्षच जाईना. मग मात्र जावईबुवांना फार राग आला. ताडदिशी उडी मारून त्यांनी स्टेजच्या दिशेने धाव घेतली. जावईबुवांच्या या वागण्याने सगळीकडे गोंधळ सुरू झाला. 'सरका, सरका बाजूला,' असे ओरडून त्यांनी स्टेजवर उडी घेऊन कीचकाला एक जोरात ठोसा लगावून दिला. इतक्या जोरात की कीचकाने डोळे पांढरेच केले! तो मोठ्याने ओरडला, "अग आई, आई! मेलो, मेलो!"



भीम मध्ये पडू लागला, तेव्हा त्यालाही जावईबुवांनी एक गुद्दा मारला. हा प्रकार पाहिल्यावर सैरंध्रीने धूम ठोकली. भीम आणि कीचक दोघेही हातात हात घालून पसार झाले. इतकेच नव्हे तर प्रेक्षकांतलेही बरेचजण पळत सुटले. पोरे रडू लागली. बायका घाबरल्या. सगळीकडे नुसता गोंधळ माजला.

नाटक तिथेच खलास झाले.

सासरेबुवांनी मोठ्या मुष्किलीने त्यांना शांत करून स्टेजवरून खाली आणले आणि गाड्या भरधाव सोडल्या.

थोडा वेळ गेला. गार वारे डोक्याला लागल्यावर जावईबुवांचे डोके जरा थंड झाले. इकडे तिकडे पाहत ते सगळ्यांना उद्देशून म्हणाले, "आता आमच्या गावी पण असंच नाटक करायचं. मीच भीम होईन. म्हणजे कटकट नाही. तुमच्या या कीचकाला तिकडं पाठवून द्याल का ?"

**शब्दार्थ व टिपा :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**अनायासे** – विनासायास; प्रयत्न न करता. **वध** – हत्या; ठार मारणे. **पौराणिक** – पुराणातील गोष्टीसंबंधी. **पाकघर** – स्वयंपाकघर. **बावचळून** – गोंधळून. **मुष्किलीने** – मोठ्या प्रयत्नाने.

**कीचकवध :** बारा वर्षांच्या वनवासानंतर पांडव एक वर्षाच्या अज्ञातवासात होते. त्यांनी हा काळ 'विराट' नावाच्या राजाच्या नगरीत वेशांतराने काढला. भीम हा राजाचा 'बल्लव' म्हणजे आचारी झाला होता. पांडवांची पत्नी द्रौपदी ही 'सैरंध्री' या नावाने राणीची दासी म्हणून राहिली होती. 'कीचक' हा विराट राजाचा उन्मत्त सेनापती होता. तो सैरंध्रीला (द्रौपदीला) फार उपद्रव देई; म्हणून बल्लवाने (भीमाने) त्याच्याशी तुंबळ युद्ध करून त्याचा वध केला.

महाभारतातल्या या कथाभागावर सुप्रसिद्ध नाटककार कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यांनी 'कीचकवध' नावाचे नाटक लिहिले व त्या काळात ते अतिशय गाजले.

**वाकप्रचार :**

**मध्ये पडणे** – मध्यस्थी करणे; भांडणतंटा मिटवण्यासाठी दोन्ही पक्षांची समजूत घालणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. भीमाचे व कीचकाचे युद्ध चालू असताना जावईबुवांनी काय केले ?

२. या पाठात तुम्हांला जावईबुवांच्या स्वभावाचे कोणते विशेष गुण दिसतात ?

३. पहिल्या गटातील शब्द दुसऱ्या गटातील योग्य शब्दांशी जोडून जोडशब्द तयार करा :

| (१) | (२) |
|---|---|
| गप्पा | पिणे |
| खाणे | पाळखी |
| कीचक | वध |
| ओळखी | टप्पा |

४. **व्याकरण :**

पुढील वाक्यांत स्वल्पविराम, पूर्णविराम, प्रश्नचिन्ह, उद्गारचिन्ह व अवतरणचिन्ह योग्य तेथे घाला आणि वाक्ये लिहा.

(अ) त्या कीचकाचा वध करायचा आहे ना समजा ऐन वेळेला नाही झाला भीमाच्या हातनं तर मी आपला आहेच.

(आ) सरका सरका बाजूला असे ओरडून त्यांनी स्टेजवर उडी घेऊन कीचकाला एक जोरात ठोसा लगावून दिला इतक्या जोरात की कीचकाने डोळे पांढरेच केले तो मोठ्याने ओरडला अग आई आई मेलो मेलो.

५. शिक्षकांच्या मदतीने हा उतारा संवादरूपाने बसवा व तो वर्गापुढे करून दाखवा.

# ३४. गाणी

## १. ध्वजगीत



माझ्या भारताचा ध्वज
उभा अजिंक्य आकाशी,
नव्या मनूचा प्रवास
याच्या मंगल प्रकाशी.

संतमुनींचा, ऋषींचा
याला आशीर्वाद मिळे,
लक्ष जीवनांची ज्योत
त्याच्या पायापाशी जळे.

माझ्या भारताचा ध्वज
निळ्या आकाशात डोले,
उषेसंगती नक्षत्र
येथे उदयाला आले.

याला अरुणदेवाने
भाळी लावले केशर,
मायदेशास मिळाला
त्यात वीरतेचा वर.

पूर्णचंद्राने तयास
दिले चांदणे नितळ,
स्नेहशांततेची भव्य
उभी राहे दीपमाळ.

सस्यशामल धरेने
दिले ऐश्वर्य मातीचे,
सूर्यचक्राने अर्पिले
व्रत अखंड गतीचे.

माझ्या देशाच्या दैवता,
तुला सहस्र वंदन,
तुझ्या रक्षणसेवेत
होवो कृतार्थ जीवन.

## २. नौबत

नौबत आता झडू दे,
उंच उंच स्वर चढू दे,
जय जय भारत विजयघोष हा या गगनाला भिडू दे.

जातपात ना आम्ही मानित,
धर्मभेद ना आम्ही जाणत,
तेज आमुच्या ह्रदयामधले काळोखावर पडू दे.

इथली गरिबी आम्ही हटवू,
समता सगळ्या जगास पटवू,
अन्यायाच्या विरुद्ध अमुची शूर मनगटे लढू दे.

लाज न आम्हा मुळी श्रमाची,
हाक ऐकतो पराक्रमाची,
नव्या जगाची नवीन मूर्ती या हातांनी घडू दे.

विज्ञानावर अमुची भक्ती,
माणुसकी ही अमुची शक्ती,
भिऊन दडली सर्व पाखरे निर्भर होऊन उडू दे.

## ३. दुनिया दो हातांची

दुनिया दो हातांची रे बाबा । दुनिया दो हातांची ।
दोन हातांमधल्या या वीतभर । भगवन् मंदिराची रे बाबा ॥

एक हात गगनास गवसणी । दुजा सागरा ओढुनि आणी ।
त्याच्या कर्तृत्वाची गाणी । सांग कुणी गायाची रे बाबा ॥

दोन हात जर नसते तर मग । उभे राहिले असते का जग ?
या उपाशी हाताची तगमग । कुठवर साहायाची रे बाबा ॥

देवे केले काय न ठावे । स्तुतीस्तोत्र का त्याचे गावे ?
विश्वनाथ भरला दो हाती ॥ पूजा करू या त्याची रे बाबा ॥

देव कुणी या जगी पाहिला । हात तुझ्या सत्वर सेवेला ।
विसरलास तू याच हाताला । सीमा कृतघ्नतेची रे बाबा ॥

